






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका

# तीर्थीं धोंडा पाणी

## देव रोकडा सज्जनीं

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

**भाषा आणि जीवन**

वर्ष १६ : अंक ३ पावसाळा १९९८






अनुक्रमणिका

## अनुक्रम



---


- प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
- संपादन - समिती : विजया देव (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर, नीलिमा गुंडी
- संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : विजया देव, सुप्रिया, ६१ / १४ एरंडवन, पुणे ४११००४ दूरध्वनी : ३६८६९३
- व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६ / ४एरंडवन, पुणे ४११००४ दूरध्वनी : ३३३८६९
- पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरण पृष्ठ तीन पहा.
- सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
- या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.
- संपादक : विजया देव, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
- मुद्रण स्थळ : सिध्दी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११०२९

संपादकीय

# हिन्दीचे काय करायचे ?

भारत हा बहुभाषिक देश आहे, हे त्याचे जसे एक वैशिष्ट्य आहे तसे येथील काही गुंतागुंतीच्या समस्यांचे ते मूळही आहे. संपूर्ण विस्तृत भूप्रदेशावर एकच एक राजवट अशी स्थिती प्राचीन भारतात क्वचितच होती. संस्कृत ही धर्माची आणि ज्ञानाची भाषा प्राचीन काळात रूढ होती. वेगवेगळ्या प्रदेशांत जी लहानमोठी राज्ये (किंवा देश) होती तेथे त्या प्रदेशाच्या भाषेचा स्वीकार होणे स्वाभाविक होते. एका प्रदेशाचा दुसऱ्या प्रदेशाशी कारणपरत्वेच संबंध येत असल्यामुळे भाषिक समस्या अशी निर्माण होण्याचे कारण नव्हते. जेत्यांची भाषा जितांना स्वीकारावी लागत असे. त्यामुळे मध्ययुगात इस्लामी आक्रमणाबरोबर फारसी भाषेचा भारतभर प्रसार आणि परिणाम झाला. सर्वसामान्य माणसांचा फारसी भाषेशी तसा संबंध नव्हता. लोकव्यवहारात जे फारसी शब्द रुळत तेवढेच त्याच्या परिचयाचे होते. यात्रा आणि व्यापार या कारणांसाठी जे लोक आपला प्रदेश सोडून दुसरीकडे ये-जा करीत असत ते बहुधा जमेल तसा हिन्दीचा उपयोग करीत असत.

इंग्रजी राजवटीपासून म्हणजे गेली दोन शतके भारतात खऱ्या अर्थाने भाषिक समस्या निर्माण झाल्या आहेत. एकच एक राज्ययंत्रणा, शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार, प्रशासन, दैनंदिन जीवनव्यवहार, व्यापार-उद्योग, न्यायव्यवस्था, प्रसारमाध्यमे अशा बहुतेक सर्व क्षेत्रांमध्ये भाषेच्या वापराबाबत प्रश्न निर्माण झाले आहेत. जे देश एकभाषी असतात त्यांना स्वभाषा सोडून क्वचितच दुसऱ्या भाषेचा स्वीकार करावा लागतो आणि स्वीकार केला तरी त्यात सक्ती नसते. केनिया, स्वित्झर्लंड, मॉरिशस, दक्षिण आफ्रिका अशा काही देशांमध्ये एकापेक्षा अधिक भाषांना समान स्थान द्यावे लागले तरी हा प्रश्न तेथे तीन-चार भाषांपुरताच असतो. भारतात मात्र चौदा (किंवा आता अठरा) प्रमुख भाषा शासनमान्य असल्यामुळे प्रश्न जटिल झाला आहे.

भारताची राष्ट्रभाषा कोणती? या साध्या प्रश्नाचे उत्तर एकदम देता येणार नाही. कारण घटनेने मान्यता दिलेल्या सर्वच अठरा भाषा या 'राष्ट्रीय' भाषा आहेत. हिन्दी आणि इंग्रजी या राजभाषा (म्हणजे शासनव्यवहाराच्या)आणि संपर्क





अनुक्रमणिका

भाषा आहेत. १४ सप्टेबर १९४९ या दिवशी घटना समितीने हिन्दी ही भारताची 'राष्ट्रभाषा' असावी असे ठराव करून म्हटले आणि क्रमशः ती इंग्रजीची जागा घेईल; सामान्यतः पंधरा वर्षांत ती इंग्रजीची जागा घेण्याइतकी समर्थ होईल. अशी आशा व्यक्त करण्यात आली. पण प्रत्यक्षात तसे काही घडले नाही. प्रजासत्ताकाला पंधरा वर्षे पूर्ण होताच तेव्हाच्या पंतप्रधानांची (श्री. लालबहादूर शास्त्री) इंग्रजीच्या जागी हिन्दी आणण्याचा प्रयत्न केला. त्याची तामिळनाडूमध्ये तीव्र प्रतिक्रिया उमटली आणि तेव्हापासून त्या राज्यात (आणि पर्यायाने दक्षिण भारतात) 'हिन्दीला विरोध' हा एक मुख्य कार्यक्रम ठरला. याउलट उत्तर भारतात अनेक ठिकाणी लोहियाप्रणित 'अंग्रेजी हटाओ' ही घोषणा दुमदुमत होती. राष्ट्रभाषेच्या संदर्भात इतकी टोकाची प्रतिक्रिया होणारा कदाचित भारत हा एकमेव देश असेल. एकाच वेळी हिन्दी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांना सांभाळून घेण्याचा प्रघात तेव्हापासून सर्वत्र पडला आहे.

स्वातंत्र्यपूर्व काळात (म्हणजे अखंड भारतात) हिन्दी ही संख्यादृष्ट्या सर्वांत मोठी भाषा होती. 'उर्दू की हिन्दी' असे काही वाद असले तरी लोक व्यवहारात जास्तीत जास्त प्रमाणात हिन्दीचा प्रचार होता आणि अहिन्दी प्रदेशात हिन्दी शिकणे हा राष्ट्रीय कार्यक्रम मानला गेला होता. त्यामुळे हिन्दीच्या प्रसाराची केन्द्रे अनेक प्रातंमध्ये निर्माण झाली होती. मद्रास (चेन्नई) मध्येही दक्षिण भारत हिन्दी प्रसार सभेचे काम चालू होते. 'हिन्दी की इंग्रजी' हा प्रश्न त्यावेळी नव्हता. राष्ट्रभाषा म्हणून हिन्दीला सर्वत्र मान्यता होती.

स्वातंत्र्यप्राप्तीपासून मात्र सगळे चित्र बदलले. विद्यालयीन शिक्षणाचे माध्यम म्हणून ती ती प्रदेश-भाषा (किंवा इंग्रजी) आणि उच्च शिक्षणाचे माध्यमं इंग्रजी ही स्थिती बहुतेक सर्व प्रदेशांमध्ये रूढ झाली. इंग्रजी आवश्यक की ऐच्छिक, संस्कृत-प्राकृत सारख्या प्राचीन भाषांचे काय करायचे, यांसारखे प्रश्न सोडविताना देशभर निश्चित धोरण न ठरविल्यामुळे सर्वत्र गोंधळाची स्थिती निर्माण झाली. भाषावार प्रान्तरचनेनंतर प्रत्येक ठिकाणी भाषिक अल्पसंख्याकांचा प्रश्नही अटळ झाला. जन्मभाषा, प्रदेश भाषा, इंग्रजी, हिन्दी, संस्कृत, इतक्या भाषांमुळे तणाव निर्माण होऊ लागले. विद्यार्थ्याला किती भाषा शिकायला लावायच्या या प्रश्नाची सोडवणूक करण्यासाठी 'त्रिभाषासूत्र' नावाचा एक तोडगा काढण्यात आला. ज्याने

त्याने आपापल्या इच्छेनुसार हे त्रिभाषासूत्र वापरल्यामुळे मूळच्या गोंधळात भरच पडली. इंग्रजीचे स्थान मात्र अधिकच पक्के झाले. शिक्षण, प्रशासन, न्यायव्यवस्था या ठिकाणी इंग्रजीशिवाय भागणारच नाही अशी सर्वांची खात्री पटल्यामुळे इष्ट असो वा नसो, पूर्वप्राथमिक स्तरापासून इंग्रजीचा वरचष्मा कायम राहिला.

राजस्थान, हरियाणा, हिमाचल प्रदेश, दिल्ली, उत्तर प्रदेश, मध्यप्रदेश, बिहार ही सर्व हिन्दीभाषी राज्ये आहेत. अहिन्दीभाषी अशा प्रदेशांत हिन्दीमुळे एक जास्तीची भाषा शिकावी लागते आणि हिन्दीचा मात्र दुहेरी लाभ होतो. ही विषमता नाहीशी होण्यांसाठी हिन्दीभाषी प्रदेशात एका वर्तमान भारतीय भाषेचा अभ्यास त्रिभाषासूत्रात अपेक्षित होता. पण कोणत्याही हिन्दी राज्याने त्याची अंमलबजावणी केली नाही. त्यामुळे हिन्दी प्रदेशात हिन्दी, इंग्रजी व संस्कृत हे 'त्रिभाषा सूत्र' आहे. तमिळनाडूमध्ये हिन्दीला कुठेही स्थान नाही. मध्यप्रदेश, बिहार या राज्यांमध्ये उर्दू ही 'दुसरी भाषा' म्हणून शिकता येते. बंगालला बंगाली, इंग्रजी आणि संस्कृत ही व्यवस्था मान्य आहे. पंजाब, गुजरात, महाराष्ट्र, ओरिसा या राज्यांनी मात्र राष्ट्रभाषा म्हणून हिन्दीचे स्थान सुरक्षित ठेवले आहे. सिंधीला स्वतःचा प्रदेशच नाही. त्यामुळे सिंधी कशी टिकवायची हाच त्या समाजापुढे प्रश्न आहे.

या सर्व गोधळात हिन्दी भाषकांचे वर्तन दुटप्पीपणाचे असल्याचे दिसते. जेथे हिन्दीला प्रखर विरोध आहे (तमिळनाडू, बंगाल) तेथे नमते घ्यायचे आणि इतरत्र राष्ट्रभाषेच्या नावाखाली हिन्दीचे आक्रमण करीत राहायचे ही त्यांची वृत्ती आहे. आकाशवाणी (हा शब्दही तामिळनाडूत वर्ज्य आहे.) आणि दूरदर्शन येथे हिन्दी आणि इंग्रजीची समान वाटणी झाल्याचे दिसते. दूरदर्शनच्या राष्ट्रीय वाहिनीवरून संकरित हिन्दी-इंग्रजी बोलणाऱ्यांचा एक वर्गच आता तयार झाला आहे. हिन्दी प्रदेशांतील अनेक केंद्रांवर इंग्रजीला मुळीच स्थान नाही. देशभरच्या राष्ट्रीयकृत बँकांमध्ये आणि केन्द्रीय कार्यालयांमध्ये काम असो किंवा नसो एक हिन्दी अधिकारी आणि इतर कर्मचारी वर्ग नेमलेला असतो.

तमिळनाडूत हिन्दी अधिकारी असतो, त्याचे काम मात्र इंग्रजीतून चालते. महाराष्ट्रात बँक ऑफ महाराष्ट्राच्या शाखांमध्ये हिन्दी अधिकारी असतो; (मराठी अधिकारी मात्र चुकूनही असत नाही!) तेव्हा शासनयंत्रणेच्या साहाय्याने 'शिरजोरी', विरोधकांच्या बाबतीत 'लाचारी' आणि अहिन्दी भाषांबाबत 'बेफिकिरी' असे

स्वतःचे 'त्रिभाषासूत्र' हिन्दी राज्यांनी अमलात आणले आहे.

स्वातंत्र्यपूर्व काळापासून महाराष्ट्राने हिन्दीबद्दल उदार धोरणच अवलंबिले आहे. (या देशाची हिन्दी हीच एकमेव भाषा असावी असे विवेचन करणारा लेख 'पेठे' नावाच्या एका मराठी गृहस्थाने १८७८ मध्येच लिहिला होता.) हिन्दीचा प्रसार महाराष्ट्रात सर्वांत अधिक झाला व आजही होत आहे. वर्धा व पुणे अशा दोन ठिकाणी असलेल्या संस्था गेली ५०-६० वर्षे हे कार्य करीत आहेत. महाराष्ट्रातील बहुतेक विद्यापीठांमध्ये हिन्दी विभाग आहे आणि बहुसंख्य महाविद्यालयांमध्ये हिन्दी विषयाची सोय आहे. मुंबईच्या बहुरंगी-बहुढंगी स्थितीमुळे तेथे हिन्दीची चलती आहे. नागपूर-विदर्भात तर हिन्दीपुढे मराठी ही 'दुसरी भाषा' वाटावी अशी स्थिती आहे. महाराष्ट्रातील आकाशवाणीची केंद्र इंग्रजी-हिन्दीचे ओझे वाहत आहेत. दूरदर्शनवर मराठीचे स्थान असून नसल्यासारखे आहे. हिन्दी, मराठी आणि कोकणीसाठी देवनागरी हीच लिपी प्रचारात असल्यामुळे हिन्दीचा प्रसार महाराष्ट्रात होण्यात कसलीच अडचण नाही. पण देवनागरी आहे म्हणून हिन्दीपणा कधी कमी झाला असे होत नाही. 'बँक ऑफ महाराष्ट्र' हे सर्वांना कळणार नाही म्हणून की काय, 'बैंक ऑफ महाराष्ट्र' चा उपचार कटाक्षाने पाळला जातो.

मध्यप्रदेशात इतिहासकाळापासून ग्वाल्हेर, इंदूर, महू, रायपूर, जबलपूर, धार, देवास, बऱ्हाणपूर अशी मराठी भाषकांची अनेक केंद्रे होती. आज तिथली मराठी संपण्याच्या मार्गावर आहे. जे महत्त्व आपल्याला महाराष्ट्रात मिळते ते आपणही मध्यप्रदेशात मराठीला दिले पाहिजे अशी तिथल्या समाजाची आणि शासनाची वृत्ती नाही. शिक्षणक्षेत्रातून असलेले मराठी काढून कसे टाकता येईल याबाबत तिथले शासन प्रयत्नशील आहे. महाराष्ट्राला लागून असलेल्या मध्य प्रदेशात ही स्थिती; तर कानपूर, झाशी, वाराणशी इथल्या दूरस्थ मराठीच्या दुरवस्थेबद्दल कल्पनाच केलेली बरी.

हिन्दीमुळे मराठी कशी बिघडत चालली आहे याबद्दल अनेकदा शब्दांची उदाहरणे देऊन चिंता व्यक्त केली जाते. पण हा प्रश्न केवळ शाब्दिक प्रभावाचा नाही. हिन्दीबाबत महाराष्ट्र शासनाने आणि मराठी माणसांनी निश्चित अशी भूमिका घेतल्याशिवाय हा गुंता सुटणार नाही.

एक भारतीय भाषा म्हणून हिन्दीचा स्वीकार अवश्य केला पाहिजे यात

शंका नाही. प्राचीन किंवा अर्वाचीन हिन्दी साहित्याची परंपराही स्पृहणीय अशीच आहे. हिन्दी भाषा आणि साहित्य यांच्या अभ्यासाला आणि सकस साहित्याच्या अनुवादाला प्रोत्साहन मिळत राहिले पाहिजे. शिक्षण, प्रशासन आणि जीवनव्यवहार या बाबतीत महाराष्ट्रात मराठीला डावलून हिन्दीचे स्तोम माजणार नाही याबाबत मात्र जागरूक (सतर्क नव्हे!) असण्याची गरज आहे.

□□□

**गं. ना. जोगळेकर**

---

## शिक्षण की शिक्षा ?

*तो झोपला होता*
*दिवस डोकीवर आला होता*
*त्याला हाक मारली आणि मी*
*म्हटलं : ऊठ, आंघोळ कर नि बसून अभ्यास कर!*
*तो हैराण टक लावून राहिला मला.*

*तो रडून रडून दमलेला होता*
*त्याला सांभाळलं, शांत केल*
*नाक पुसलं मी*
*म्हटलं : आता बसून अभ्यास कर!*
*तो निमूटपणाने पाहत राहिला मला.*

*तो पळापळीचा काही खेळ*
*खेळत होता*
*धुळीने मळकट झालेला होता. मी*
*म्हटलं : घरी जा, बसून अभ्यास कर!*
*तो खिन्न असून टकमक बघत राहिला मला.*

*तो टी व्ही बघत होता*
*हसतां हसतां मुरकुंडी वळला होता.*
*स्विच दाबून टीव्ही ऑफ केलं मी*
*म्हटलं : वेळ नकोस गमावू, अभ्यास कर!*
*तो रागाने रोखून पाहत राहिला मला.*

**श्यामविमल**
**बी-१६, सेक्टर,नोयडा २०१ ३०१**

# वाटचाल 'कॉपीराईट' ची

**ॲड. अविनाश गानू**

आपल्या संस्कृतीत ''विद्या धनं सर्व धनं प्रधानम्'' असे आपण शिकत आलो; पण ते विद्येचा गौरव करण्याच्या हेतूने, विद्येचे धनात रूपांतर करण्यासाठी नव्हे. आपल्याकडे विद्याव्रती व कलेचे सेवक बहुधा निर्धनच असत. आपल्याला जमीन-जुमला, घरे, सोने-नाणे, शेअर्स, ठेवी इत्यादी रूपांतील मालमत्ताच परिचित असे. परंतु आता 'इंटलेक्चुअल प्रॉपर्टी' म्हणजे 'बौद्धिक संपदा' ही संकल्पना रूढ झाली आहे; ती बौद्धिक सृजनाचा अर्थकारणाशी संबंध दाखविण्याकरिता. बौद्धिक संपदेलाही आर्थिक परिमाण लाभले आहे. विशेषतः परकीय भांडवल, परकीय तंत्रज्ञान, आपल्या देशाचे नवे आर्थिक उदार धोरण आणि नव्या 'गॅट' कराराने लादलेल्या शर्ती या संदर्भात बौद्धिक संपदा हा देखील सर्वांच्या कुतूहलाचा व चर्चेचा विषय झाला आहे.

बौद्धिक संपदेचे वेगवेगळे प्रकार आहेत. त्यांपैकी पेटंट, ट्रेडमार्क, औद्योगिक आराखडे व कॉपीराईट या चार प्रकारच्या संपदांबाबत भारतात कायदे झालेले आहेत. यातील कॉपीराईट सोडून बाकी तीन हे मुख्यतः उद्योगविषयक हक्क आहेत आणि कॉपीराईट ही मुख्यतः साहित्य, कला, संगीत अशा कलानिर्मितीशी संबंधित अशी बौद्धिक संपदा आहे. परंतु साहित्य, कला क्षेत्राच्या केवळ सृजनशीलतेशी कॉपीराईटचा संबंध नसून त्याच्या अर्थकारणाशी 'कॉपीराईट' हे प्रामुख्याने निगडीत आहे. खरे तर हे अर्थकारण निर्मात्याच्या हाती असावे हा कॉपीराईट कायद्याचा उद्देश आहे.

साहित्य, कला, संगीत क्षेत्रातील निर्मिती ही त्या त्या निर्मात्याची बौद्धिक संपदाच असते. या हक्काला कॉपीराईट असे नाव रूढ झाले आहे. गेल्या दोन-तीन शतकांत कॉपीराईटची संकल्पना विकसित होत गेली. निर्मात्याच्या हक्कांमध्ये आणि निर्मितीच्या प्रकारांमध्ये वेळोवेळी भर पडत गेली आहे. त्यामुळे कॉपीराईट शब्दाचे केवळ शाब्दिक भाषांतर करून तो अर्थ प्रतिबिंबित होणार नाही त्यामुळे या लेखात कॉपीराईट हाच शब्द वापरलेला आहे.

'कॉपीराईट' चा अगदी प्राथमिक अर्थ म्हणजे प्रती काढण्याचा अधिकार व अन्य कोणी अनधिकाराने प्रती काढत असेल तर त्याला रोखण्याचा अधिकार.





अनुक्रमणिका

अर्थातच प्रती काढण्याचे तंत्र शोधले जाण्यापूर्वी या अधिकाराचा विचार करण्याचा प्रश्नच नव्हता. पण मुद्रणकलेच्या शोधानंतर अनधिकाराने लेखन छापून गैरफायदा मिळविला जाऊ लागला तेव्हा असा काही हक्क असावा अशी कल्पना मूळ धरू लागली. त्याची सुरुवात इंग्लंडमध्ये झाली.

कॉपीराईट या कल्पनेचे मूळ इंग्लंडमध्ये असल्यामुळे कॉपीराईटच्या वाटचालीचा मागोवा घेताना इंग्लंडपासून सुरूवात करणे योग्य आहे. इंग्लंडच्या पाठोपाठच पण थोड्या वेगळ्या आधारावर या कल्पनेचा युरोपमध्ये विकास झाला त्यामुळे त्या वेगळेपणाचाही थोडक्यात विचार लेखात केला आहे. आज सर्व जगात कॉपीराईटच नव्हे तर अन्य बौद्धिक संपदांच्या रक्षणाबाबतही कडक कायदे हवेत असा अमेरिकेचा आग्रह आहे. त्यामुळे अमेरिकेची सुरुवातीची भूमिका काय होती, तीत बदल कसा झाला हे पाहणेही इष्ट आहे.

**इंग्लंड**

इंग्लंडमध्ये नंतर ज्यांना 'पब्लिशर्स' म्हटले जाऊ लागले ते पूर्वी स्वतःला 'स्टेशनर्स' म्हणवून घेत. लेखकाकडून परवानगी घेऊन आर्थिक गुंतवणूक करणाऱ्या स्टेशनर्सना स्वतःच्या संरक्षणाकरिता त्या साहित्याबाबत कायद्याने मान्य असा काही हक्क असावा असे वाटू लागले. त्यातून 'स्टेशनर्स कंपनी' ने लायसन्स देण्याची पद्धत सुरू झाली. ती सतराव्या शतकात चालू होती. पण पुरेशी नव्हती व कायदा आणि त्याच्या यंत्रणेचे बळ या पद्धतीमागे उभे नव्हते. त्यामुळे 'कॉपीराईट' कायद्यासाठी स्टेशनर्सची पार्लमेंटकडे जोरदार मागणी सुरू झाली. अर्थातच त्यासाठी लेखकांना पुढे करून व यांच्या लोकप्रियतेचा व समाजातील स्थानाचा उपयोग करून कायदा करून घेण्याची धंदेवाईक हुशारी स्टेशनर्सनी दाखविली. या त्यांच्या प्रयत्नातून १७०९ साली इंग्लंडमध्ये पहिला 'कॉपीराईट ॲक्ट' आला तो 'ॲन' चा कायदा म्हणून ओळखला जाई. या कायद्यात १८१४ ते १८४२ साली महत्त्वाचे बदल झाले.

लेखनासंदर्भाच्या हक्काबाबत कायद्याची प्रगती होत असताना कपड्याच्या डिझाईनचे साचे, शिल्पकला, चित्रकारांच्या कलाकृती, छायाचित्रे, नाटके इत्यादी वेगवेगळ्या कलानिर्मितींमधील हक्कांबाबतच्या संरक्षणाकरिता वेगवेगळे कायदे होऊ लागले. वक्त्यांच्या भाषणाच्या हक्कांसंदर्भात कायदे झाले. ग्रामोफोन, सिनेमांच्या

शोधांमुळे कलाक्षेत्रातील हक्कांबाबत आणखी वेगळा विचार करण्याची जरुरी निर्माण झाली.

लेखन, कला, संगीत, सिनेमा क्षेत्रातील 'कलानिर्मिती' ला संरक्षण देण्यासाठी १९११ साली सर्वंकष स्वरूपाचा 'कॉपीराईट ॲक्ट' ब्रिटिश पार्लमेंटने केला. हा कायदा त्या काळातला कॉपीराईट क्षेत्रातला आदर्श असा कायदा होता. या कायद्याने वेगवेगळ्या कलाकृती व निर्मितीबाबत जे वेगवेगळे कायदे झाले होते असे सतरा कायदे या कायद्यात समाविष्ट केले गेले. ब्रिटिश सत्ता त्यावेळी भरात असल्याने इंग्लंडच्या आधिपत्याखालील राष्ट्रांमध्ये त्याला अनुसरून कायदे झाले. एवढे असूनही या कायद्याची उपयुक्तता अर्धशतकही टिकली नाही. ध्वनिमुद्रण, दूरदर्शन इत्यादी क्षेत्रांतील तांत्रिक प्रगतीमुळे हा कायदाही अपुरा वाटला. त्यामुळे इंग्लंडमध्ये १९५६ साली सुधारित कॉपीराईट कायदा आला. नंतर त्याही कायद्यात सुधारणा करण्याची वेळ आली व १९८८ साली सध्या अंमलात असलेला कायदा इंग्लंडमध्ये लागू झाला.

### युरोप

ब्रिटन सोडून उर्वरित युरोपातील (कॉन्टिनेन्ट) लेखकाच्या व कलाकाराच्या हक्काची कल्पना मुळातच वेगळ्या पायावर उभी राहिली. ब्रिटनमध्ये त्याच्याकडे मालमत्ता म्हणून पाहून आर्थिक अधिकारांचा प्रामुख्याने विचार झाला. युरोपात लेखकांच्या व कलाकारांच्या हक्कांच्या विचार त्याची बौद्धिक निर्मिती व सृजनशीलता यांच्या आदरापोटी झाला. त्यामुळे लेखन अथवा कलाकृतीतील निर्मात्याच्या नैतिक अधिकाराचाही (फ्रेंचमध्ये द्रुआ मॉरल किंवा इंग्लिशमध्ये मॉरल राईट) आर्थिक हक्कांच्या बरोबरीने विचार झाला. त्यातही फ्रान्समध्ये नैतिक हक्क हे आर्थिक व्यवहाराने विकले न जाणारे मानले गेले. जर्मनीमध्ये नैतिक व आर्थिक हक्कांचा एकत्रित विचार होऊ लागला. ब्रिटनमध्ये लेखक व कलाकारांना त्यांचे नैतिक हक्क कायद्यांत न शोधता 'टॉर्टस्' मध्ये शोधावे लागले.

### अमेरिका

अमेरिकेत पहिला कॉपीराईट कायदा १७९० साली आला. तो इंग्लिश कायद्याप्रमाणेच होता. परंतु परदेशी लेखकांना त्यात संरक्षण नव्हते. त्यामुळे लोकप्रिय इंग्लिश लेखकांचे साहित्य त्यांना रॉयल्टी न देता मुबलक छापले जात

असे. आज उच्चरवाने कॉपीराईट व अन्य बौद्धिक संपदांच्या संरक्षणाचा उद्‍घोष करणारी अमेरिका त्यावेळी विकसित नव्हती. विकसित देशातल्या कला, साहित्य, तंत्रज्ञान यांच्या तथाकथित चाचेगिरीवरच तिने विकासाच्या मार्गावर वाटचाल केली. पुढची शंभर वर्षे परकीय लेखक व कलाकारांच्या हक्कांची अशीच पायमल्ली अमेरिकेत होत होती. १८९१ सालच्या कायद्याने ती स्थिती बदलली. त्यानंतर १९७६ साली अमेरिकेत अद्ययावत असा कॉपीराईट कायदा आला. तंत्रज्ञानाच्या प्रगतीचा पूर्ण विचार करून त्यानुसार या कायद्याच्या तरतुदी केल्या आहेत. अमेरिकन कायद्यानुसार कॉपीराईटच्या रजिस्ट्रेशनची आवश्यकता आहे.

इंग्लंड, युरोपीय देश व अमेरिका या कॉपीराईट साहित्य व कृतींच्या मुख्य निर्यातदार देशांमधल्या 'कॉपीराईट' हक्कांचा मागोवा घेतल्यावर जागतिक स्तरावर कॉपीराईटचा व्यापक विचार कसा केला गेला व त्याबाबत विविध आंतरराष्ट्रीय करार आणि आंतरराष्ट्रीय संघटना कशा निर्माण झाल्या याचा विचार पुढे केला आहे.

### कॉपीराईट आणि आंतरराष्ट्रीय घडामोडी

अठराव्या शतकाच्या सुरुवातीला राष्ट्रीय पातळींवर कायद्याच्या रूपात आलेली कॉपीराईटची कल्पना एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस आंतरराष्ट्रीय पातळीवर आली. युरोपीय राष्ट्रांच्या पुढाकाराने कॉपीराईटविषयक पहिला आंतरराष्ट्रीय करार बर्न येथे होऊन त्याच्या सभासद राष्ट्रांनी संघटना केली, या करारामध्ये फेरबदल होत होते व सभासद राष्ट्रांची संख्या वाढती होती. परंतु त्यातून बाहेर राहिलेलेही बरेच देश होते. त्यांनीही जागतिक बंधन स्वीकारावे यासाठी युनेस्कोच्या पुढाकारांने 'बर्न' ला पूरक पण वेगळा आंतरराष्ट्रीय करार १९५२ मध्ये झाला. १९६७ मध्ये 'वायपो' या बौद्धिकसंपदा विषयक आंतरराष्ट्रीय संघटनेची स्थापना झाली. गेल्या दशकात जागतिक व्यवस्थेचे केंद्र युनोकडून जागतिक व्यापार संघटनेकडे (वर्ल्ड ट्रेड ऑर्गनायझेशन) सरकल्याने गॅट अंतर्गत 'ट्रिप्स' करार हा कॉपीराईट विषयक महत्त्वाचा करार झाला आहे. या अनेक करारांचा व संस्थांचा आढावा येथे घेतला आहे.

### बर्न कन्व्हेन्शन

युरोपाय राष्ट्रांमध्ये कॉपीराईट क्षेत्रात एकीकडे राष्ट्रीय कायदे केले जात





अनुक्रमणिका

असताना स्वतःच्या देशातील साहित्य व कलाकृतींना परदेशातही कॉपीराईटच्या संरक्षणाची आवश्यकता असल्याची गरज जाणवू लागली त्यातून पाहिल्या आंतरराष्ट्रीय 'कॉपीराईट' संघटनेची स्थापना झाली १८८६ साली 'बर्न कन्व्हेन्शन' वर सह्या झाल्या. यावर प्रथम सह्या करणारी ९ राष्ट्रे होती. ती प्रामुख्याने युरोपातील होती. त्यात ग्रेट ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, इटलीचा समावेश होता. ही संघटना 'बर्न युनियन' या नावाने ओळखली जाऊ लागली ती अद्यापही चालू आहे. आज तर ही कॉपीराईट क्षेत्रातील जगातील बहुसंख्य राष्ट्रांनी मान्य केलेली संघटना आहे.

बदलत्या परिस्थितीस अनुसरून बर्न कन्व्हेशनमध्ये सुधारणा केल्या गेल्या. १८८६ च्या स्थापनेनंतर १८९६, १९०८, १९१४, १९२८, १९४८, १९६७, १९७१ असे मूळ बदल कन्व्हेन्शन मध्ये झाले. यापैकी १९६७ च्या स्टॉकहोम करारात विकसनशील राष्ट्रांच्या 'कॉपीराईट' कडे पाहण्याच्या दृष्टिकोणाला प्रथमच आंतरराष्ट्रीय स्तरावर स्थान मिळाले. विकसनशील राष्ट्रांतील बहुसंख्य राष्ट्रे त्यापूर्वी २-३ दशकांत स्वतंत्र झालेली होती. त्यांच्या देशातील कॉपीराईट कायदे हे त्यांच्यावर राज्य करणाऱ्या परकीयांनी त्यांच्यावर लादलेले होते. विकसित देशातील साहित्य-कलांची 'रॉयल्टी' त्या देशांना निर्वेध मिळत राहावी अशीच त्यात मुख्यतः सोय होती. पण स्वातंत्र्यानंतर यातील अनेक राष्ट्रांनी कॉपीराईट हक्काचा कालावधी कमी केला. राष्ट्रीय भाषेत या साहित्याच्या भाषांतरावरची तसे शैक्षणिक वापरावरची बंधने उठवली. अवाजवी रॉयल्टीचे हक्क काढून टाकले. स्टॉकहोम करार सर्व विकसित राष्ट्रांना मान्य नव्हता म्हणून ४ वर्षांनी पॅरिस करारात पुन्हा सर्वमान्य बदल केले गेले. विकसनशील राष्ट्रांच्या शैक्षणिक वापराबाबतच्या व स्थानिक भाषेतील भाषांतराबाबतच्या मुद्द्यांना मात्र त्यात स्थान मिळाले. भारत हा बर्न युनियनचा सभासद आहे.

**युनिव्हर्सल कॉपीराईट कन्व्हेन्शन**

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात बरीच राष्ट्रे 'बर्न युनियन'ची सभासद होती परंतु अमेरिका व रशिया हे त्याला प्रमुख अपवाद होते. अमेरिका ही स्वतःच्या राष्ट्रीय हिताची इतरांच्या हितापेक्षा जास्त काळजी करत असल्याने इंग्लंड, युरोपातील साहित्यिकांच्या, कलाकारांच्या हक्काची अमेरिकेने कधी काळजी





अनुक्रमणिका

केली नाही. त्यांचे साहित्य अमेरिकेत विपुल प्रमाणांत पुनर्मुद्रित होत होते. त्यामुळे अमेरिकेवर आंतरराष्ट्रीय बंधन असावे असे अन्य विकसित राष्ट्रांना वाटत होते.

युनेस्कोच्या पुढाकाराने १९५२ साली युनिव्हर्सल कॉपीराईट कन्व्हेशनची स्थापना झाली. बर्न कन्व्हेन्शनपेक्षा त्यातील कॉपीराईट संरक्षण कमी दर्जाचे होते. अमेरिका त्याची सभासद झाली. रशियाही अशा करारांबाबत पूर्वी उदासीन होता परंतु तोही या युनियनचा सभासद झाला. बर्न कन्व्हेन्शनला पूरक अशीच भूमिका युनिव्हर्सल कॉपीराईट कन्व्हेशनने घेतली.

कोणत्याही प्रकाशित साहित्यावर © असे चिन्ह छापून त्यापुढे कॉपीराईट हक्क असणाऱ्यांचे नाव व प्रथमप्रकाशनाचे वर्ष नमूद करण्याची प्रथा कन्व्हेशनमुळे रूढ झाली. भारत हा या करारातही सहभागी आहे.

**वायपो**

१९६७ साली वर्ल्ड इंटलेक्चुअल प्रॉपर्टी ऑर्गनायझेशनची (WIPO) स्थापना झाली. बौद्धिक संपदेशी संबंधित पॅरिस, बर्न इ. कन्व्हेन्शन्सच्या व्यवस्थापनाचे काम वायपो करू लागली. १९७४ साली युनोने वायपोला युनोच्या विशेष प्रातिनिधिक संघटनेचा दर्जा दिला. विकसनशील राष्ट्रांना बौद्धिक संपदेच्या कायद्यांबाबत किंवा संबंधित अन्य मार्गदर्शन करण्यात वायपोचा मोठा सहभाग होता.

**गॅट करार**

गॅट हा मूलतः आंतरराष्ट्रीय व्यापारातील नियंत्रणे (टॅरिफ बॅरियर्स), विषयीचा करार. त्यामध्ये बौद्धिक संपदेचा दूरान्वयानेही संबंध नव्हता. परंतु बौद्धिक संपदेविषयीच्या पॅरिस, बर्न कन्व्हेन्शन्ससारख्या आंतरराष्ट्रीय करारांमध्ये वं वायपो सारख्या संस्थांमध्ये विवादात तोडगा काढण्याची काही सोय नव्हती. विकसित देशातील विशेषतः अमेरिकेतील औद्योगिक कंपन्यांमुळे अमेरिकेने बौद्धिक संपदेचा समावेश गॅट मध्ये करण्याचे ठरवले. विकसनशील राष्ट्रांच्या बऱ्याच विरोधानंतरसुद्धा विकसित राष्ट्रांच्या, विशेषतः अमेरिकेच्या दडपणामुळे झालेल्या सहमतीने युरुग्वे फेरीमध्ये कराराचा अंतिम मसुदा मान्य झाला.

या अंतिम करारात बौद्धिक संपदेविषयी वेगळा ट्रिप्स करार (ट्रेड रिलेटेड आस्पेक्टस् ऑफ इंटलेक्च्युअल प्रॉपर्टी TRIPS) मान्य झाला. त्यात बौद्धिक

संपदांबरोबर कॉपीराईटचा विभाग आहे. या कराराने बर्न कन्व्हेन्शन हे पायाभूत मानले आहे. या करारातील सर्व सभासद राष्ट्रे बर्न कराराची आपोआप सभासद असल्याचे मानले आहे. राष्ट्रीय दर्जा (नॅशनल ट्रीटमेंट) व विशेष पसंत राष्ट्राचा (मोस्ट फेव्हर्ड नेशन- MFN) ऑब्लिगेशन ही गॅटची मूलभूत तत्त्वे ट्रिप्स करारातही आली आहेत. पण अमेरिकेच्या आग्रहानुसार कॉम्प्युटर सॉफ्टवेअर व कॉम्प्युटर प्रोग्रॅम्स् यांना लेखन व साहित्य (लिटररी वर्क) मानून त्यांना कॉपीराईट संरक्षण मिळण्याचा हक्क ट्रिप्स कराराने मिळाला. युरुग्वे फेरीतील अंतिम करारास मान्यता देणाऱ्या सर्व राष्ट्रांनी जागतिक व्यापार संघटनेची (वर्ल्ड ट्रेड ऑर्गनायजेशन WTO) स्थापना केली. गॅट, ट्रिप्स् व अशा अन्य करारांतील तरतुदींची सभासद राष्ट्रांनी आपल्या देशात अंमलबजावणी न केल्यास त्या राष्ट्रांच्या विरुद्ध संघटनेकडे दाद मागण्याची सोय या संघटनेत आहे. अशा राष्ट्रांच्या विरुद्ध करार मोडण्याचा बदला घेण्यासाठी कोणतेही व्यापार निर्बंध अन्य देशांना लादता येतात. भारताने व अन्य विकसनशील राष्ट्रांनी बौद्धिक संपदा विषयक कायदे कडक करावेत यासाठी अशा व्यापार निर्बंधांचा उपयोग केला जाईल असे चित्र आज दिसत आहे.

**भारतातील कॉपीराईट कायद्याची पार्श्वभूमी**

ब्रिटिश राजवटीत भारतामध्ये १९१४ साली पहिला कॉपीराईट कायदा अंमलात आला. त्यापूर्वी नुकताच इंग्लंडमध्ये १९११ सालचा वेगवेगळ्या प्रकारच्या कॉपीराईट हक्कांना एकत्र करणारा सर्वसमावेशक असा कॉपीराईट कायदा केला गेला होता. त्याच कायद्यावर आधारित परंतु थोडेफार बदल करून भारतीय कायदा तयार झाला. भारत स्वतंत्र झाल्यानंतर भारतीय राज्यघटनेला अनुसरून नव्या कायद्याची आवश्यकता होती. तसेंच १९११ नंतरचे तंत्रज्ञानातील फेरबदलही विचारात घेणे जरुरीचे होते. दरम्यान इंग्लंडमध्ये तंत्रज्ञानातील बदलाचा विचार करून १९५६ साली नवा कायदा अंमलात आला होता. त्याही कायद्याचा विचार करून भारतात १९५७ साली नवा कॉपीराईट कायदा मंजूर झाला. त्यानंतर कॉपीराईट कायद्यात १९८३, १९८४, १९९२ व १९९४ साली बदल करण्यात आले.

**भारतातील सध्याचा कॉपीराईट कायदा**

भारतातील कायद्याप्रमाणे कॉपीराईट हा केवळ कॉपीराईट कायद्यानुसार निर्माण केलेला हक्क आहे. म्हणजेच या कायद्याव्यतिरिक्त आणखी कोणताही

तत्सम हक्क लेखक अगर कलाकारास सांगता येत नाही. कॉपीराईट कायद्यामध्ये 'आर्टिस्टीक वर्क'; 'ब्रॉडकास्ट'; 'म्युझिकल वर्क' अशा अनेक शब्दांच्या कायद्याला अभिप्रेत असलेल्या व्याख्या केलेल्या आहेत. अशा सर्व शब्दांचे अर्थ या कायद्याच्या संदर्भात तांत्रिक दृष्टीनेच विचारात घेतले जातात. कदाचित हे अर्थ व्यवहारातील रूढ अर्थापेक्षा वेगळे असू शकतात. कॉपीराईट हा हक्क लेखकाच्या अगर कलाकाराच्या त्या त्या विशिष्ट साहित्यकृतींमधला हक्क असतो. त्या कलाकृतीमागच्या कल्पनेमध्ये अगर त्या विषयामध्ये कॉपीराईटचा हक्क नसतो.

साहित्यकृती, नाट्यकृती, संगीत रचना, कलाकृती, चित्रपट, ध्वनिमुद्रण, संगणक प्रोग्रॅम या विविध प्रकारच्या निर्मितीचा विचार भारतीय कॉपीराईट कायद्यामध्ये केला आहे.

साहित्यकृती आणि नाट्यकृतींमधील कॉपीराईटचा हक्क हा लेखकाचा असतो. संगीतरचनेमधील कॉपीराईटचा हक्क संगीतकाराचा असतो. प्रकाशचित्राचे कॉपीराईटचा हक्क प्रकाश-चित्रकारांचा असतो. चित्रपटाचा आणि त्याच्या ध्वनिमुद्रणाच्या कॉपीराईटचा हक्क चित्रपटनिर्मात्याचा असतो. संगणकात निर्मिलेल्या कोणत्याही साहित्य, नाट्य, संगीत अगर कलाकृतीमधील कॉपीराईटचा हक्क त्याच्या निर्मात्याचा म्हणजे ती निर्मिती करवून घेणाऱ्याचा असतो. या सर्व हक्कधारकांकडे कॉपीराईट हक्काचे प्रथम स्वामित्व असते. मात्र काही वेळा लेखक किंवा निर्माता ती कृती अन्य कोणाच्या नोकरीत नोकरीचा भाग म्हणून करीत असतो. अशावेळी मात्र नोकर म्हणून त्या लेखक किंवा निर्मात्याचा हक्क त्याच्या मालकाकडे जातो.

कॉपीराईटचा हक्क म्हणजे अनेक हक्कांचा समुच्चय असतो. साहित्य आणि नाट्यकृतीचा विचार केला तर कॉपीराईटमध्ये पुढील हक्कांचा अंतर्भाव होतो

- ती कृती पुनर्मुद्रित करणे.
- इलेक्ट्रॉनिक साधनांच्याद्वारे निरनिराळ्या माध्यमांत प्रती काढणे.
- प्रतीचे वितरण करणे.
- त्या साहित्य / नाट्यकृतीचे कार्यक्रम करणे.
- त्या साहित्य / नाट्यकृतीवरून चित्रपट बनविणे.





अनुक्रमणिका

- त्या साहित्य / नाट्यकृतीचे ध्वनिरूपांतर करणे.
- त्या साहित्य / नाट्यकृतीचे भाषांतर करणे.
- साहित्यकृतीचे नाट्यकृतीत किंवा अन्य साहित्य प्रकारात रूपांतर करणे. तसेच नाट्यकृतीचे अन्य साहित्य प्रकारात रूपांतर करणे.

अन्य प्रकारच्या निर्मितींच्या बाबतीत थोड्याफार फरकाने वरीलप्रमाणे हक्क कॉपीराईट धारकास असतात.

**कॉपीराईटचा कालावधी**

साहित्यकृती, नाट्यकृती, संगीतरचना व कलाकृतीमधील कॉपीराईटचा हक्क त्याच्या लेखक / निर्मात्याच्या हयातीपर्यंत व त्याच्या मृत्यूनंतर येणाऱ्या वर्षापासून ५० वर्षापर्यंत असतो.

प्रकाशचित्रे, चित्रपट, रेकॉर्ड याबाबतीत कॉपीराईट हा हक्क निर्मात्याच्या हयातीशी जोडलेला नाही. तो हक्क त्या त्या कृतींच्या प्रसिद्धीपासून ५० वर्षेपर्यंत असतो. अनामिक व टोपणनावाने केलेल्या साहित्यकृती, नाट्यकृती, संगीतरचना व कलाकृतींमधील कॉपीराईटचा हक्क त्याच्या निर्मात्याने त्याच्या हयातीत नाव प्रगट न केल्यास त्याच्या हयातीशी निगडीत राहत नाही व तो निर्मितीच्या प्रसिद्धीपासून ५० वर्षे पर्यंतच राहतो.

**कॉपीराईटचे हस्तांतर व परवानगीने वापर**

कॉपीराइट ही हक्कधारकाची वैयक्तिक मालमत्ता असते. कोणत्याही अन्य मालमत्तेप्रमाणे त्याचा विनियोग त्याला करता येतो. ही मालमत्ता त्याला त्याच्या हयातीत किंवा हयातीनंतर अन्य कोणास इच्छेनुसार देता येते.

हक्कधारकाचा हक्क त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या वारसांना मिळतो. परंतु हक्कधारक या हक्कांबाबत मृत्युपत्रात व्यवस्था करून तो हक्क त्याच्या पश्चात कोणालाही आपल्या इच्छेनुसार देऊ शकतो.

हक्कधारकास त्याच्या हयातीतही हा हक्क अन्य कोणास देता येतो. मोबदला घेऊन हक्काची विक्री (असाइनमेंट) किंवा तात्पुरत्या वापराची परवानगी (लायसेन्स) अशा दोन पद्धती प्रामुख्याने वापरल्या जातात. यातील 'असाइनमेंट' मध्ये हक्काचे हस्तांतरण (ट्रान्स्फर) होत असते, म्हणजे तो हक्क घेणारास 'असाइनमेंट' मध्ये नमूद केलेला हक्क मालकीने मिळतो. 'लायसेन्स' मध्ये

हक्कांचे हस्तांतरण होत नाही. लायसेन्स घेणाऱ्यास हक्क वापरण्याची परवानगी मिळते.

सामान्यतः 'लायसेन्स' हे लेखक किंवा निर्माता त्याच्या इच्छेनुसार देतो. परंतु विशिष्ट परिस्थितीत कॉपीराइट बोर्ड हे त्याच्या इच्छेविरुद्ध 'सक्तीचे लायसेन्स' देऊ शकते. लेखक किंवा निर्मात्याचा 'कॉपीराइट' हक्क मान्य करण्यामागे आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक अशी वेगवेगळी कारणे दिली जातात. पण तो हक्क जपल्यावर ती साहित्यकृती किंवा अन्य कृती जनतेला उपलब्ध असावी ही एक भूमिका त्यामागे असते. लेखक किंवा निर्माता त्याची कृती जनतेस सुलभ व वाजवीपणे उपलब्ध होऊ देत नसेल तर कायद्याने सक्तीच्या 'लायसेन्स'ची तरतूद ठेवली आहे. कॉपीराइट कायद्यात भारतीय साहित्य व अन्य कृतींबाबत वेगळी आणि परकीय साहित्य व कृतींबाबत वेगळी अशा वेगवेगळ्या तरतुदी केलेल्या आहेत. बर्न कन्व्हेन्शन व युनिव्हर्सल कन्व्हेन्शननेही कमी-अधिक प्रमाणात सक्तीच्या लायसेन्सची तरतूद मान्य केली आहे.

कॉपीराईटची असाइनमेंट ही लिखित स्वरूपात व हक्क धारकाच्या सहीनेच होते. कॉपीराईटचा हक्कधारक हा त्याने निर्मिलेल्या किंवा निर्माण करावयाच्या कृतीबाबत असाइनमेंट करू शकतो. अशा असाइनमेंटने त्याचे सर्वच हक्क द्यावे लागतात असे नाही. तो हक्कधारक त्या निर्मितीबाबतच्या त्याच्या अनेक हक्कांपैकी काही किंवा एकाच हक्काची असाइनमेंट करू शकतो. अशी असाइनमेंट ही कॉपीराईटच्या संपूर्ण कालावधीकरिता किंवा त्याच्या काही भागाकरिताही करू शकतो.

साधारणपणे लेखक हा त्याच्या लेखनाचा हक्क प्रकाशकाला कोणत्या ना कोणत्या स्वरूपात असाइन करतो. काही वेळा केवळ त्या आवृत्तीपुरता हक्क दिलेला असतो तर काही वेळा काही कालावधीमधल्या आवृत्त्यांचा हक्क दिलेला असतो. त्या लेखनाबाबतचे, आवृत्ती काढण्याखेरीज, भाषांतराचा, त्यावरून चित्रपट काढण्याचा, त्याची ध्वनीफीत करण्याचा इ. अन्य सर्व हक्क लेखकाने प्रकाशकाला दिलेले नसल्यास लेखकाकडे राहतात.

बहुतेक वेळा लेखक व प्रकाशकामधले वाद किंवा गैरसमज हे योग्य दस्त किंवा करार न केल्याने होतात. केलेल्या कागदपत्रात जरूर त्या सर्व बाबींचा





अनुक्रमणिका

सुस्पष्ट खुलासा केलेला नसतो. त्यामुळे त्या करार किंवा दस्तामध्ये संदिग्धता राहाते व दोन्ही बाजूंच्या दृष्टीने त्याचे वेगवेगळे अर्थ लावले जातात. त्यामुळे अशा करार किंवा दस्तात साहित्य वा अन्य कृतीचा पुरेसा तपशील, लेखकाला असलेल्या वेगवेगळ्या हक्कांपैकी नेमका कोणता हक्क, किती कालावधीकरिता, कोणत्या क्षेत्राकरता दिला त्याचा तपशील, तसेच मोबदला व रॉयल्टीबाबतच्या स्पष्ट शर्ती इत्यादी सर्व मुद्द्यांचा समावेश असणे जरूर आहे.

**कॉपीराईटधारकाच्या हक्कांचा भंग**

कॉपीराईट हा एका अर्थाने नकारात्मक अधिकार आहे. त्यामुळे हक्कधारक लेखक किंवा निर्मात्याला त्याच्या कृतीबाबत अन्य कोणी कोणकोणत्या गोष्टी करू नयेत असा नकारात्मक हक्क मिळतो. तो हक्क डावलून अन्य कोणी अनधिकाराने हक्कधारकाच्या हक्कांपैकी कोणताही हक्क वापरणे म्हणजे धारकाच्या कॉपीराइट हक्काचा भंग होय. एखाद्या साहित्यकृतीचे लेखकाच्या किंवा हक्कधारकाच्या परवानगीशिवाय मुद्रण करणे, त्यावरून नाट्यकृती करणे, चित्रपट बनविणे, ध्वनिफीत बनविणे, भाषांतर करणे ही सर्व उघड-उघड हक्कभंगाची उदाहरणे आहेत. पण अनेक वेळेला हक्कभंग करणारा अशी नक्कल लबाडीने आणि हुशारीने करीत असतो. मूळ लेखनातील नावे बदलणे, स्थळे बदलणे, असे बारीक-सारीक बदल करून मूळ कृतीची नक्कल केली जाते. परंतु असे बारीक-सारीक बदल करूनही ती मूळ कृतीची नक्कल आहे असे सामान्य वाचकाला वाटत असेल तर न्यायालय त्याकडे कॉपीराइटचा भंग म्हणूनच पाहते.

कॉपीराइटच्या भंगाबाबत हक्कधारकास तीन प्रकारे उपाययोजना करता येते. हक्कधारकास दिवाणी कोर्टात, फौजदारी कोर्टात किंवा कॉपीराइट रजिस्ट्रार व बोर्डाकडे प्रशासकीय स्वरूपाच्या तक्रारी करता येतात.

दिवाणी कोर्टाकडे हक्कधारकास दावा करून जरुरीप्रमाणे एक किंवा अधिक वेगवेगळ्या मागण्या करता येतात. हक्काचा भंग करणाऱ्या प्रतिवादीने तसा भंग पुढे चालू ठेवू नये म्हणून त्याच्याविरुद्ध मनाईहुकूम मागता येतो. प्रतिवादीने हक्कभंग केल्यामुळे लेखक अगर निर्मात्याचे नुकसान झालेले असेल तर त्याची भरपाई मागण्याचा त्यास हक्क असतो. नुकसानभरपाईच्या ऐवजी प्रतिवादीने केलेल्या बेकायदेशीर कमाईचे प्रत्यक्ष हिशोब वादीस मागता येतात व प्रतिवादीने केलेली





अनुक्रमणिका

बेकायदेशीर कमाई वादीस मागता येते. तसेच बेकायदेशीर साहित्य जप्त करून कोर्टात आणता येते.

कॉपीराईटचा भंग ही कायद्यानुसार केवळ दिवाणी स्वरूपाची बाब नाही. कॉपीराईट कायद्याने हे फौजदारी स्वरूपाचे गुन्ह्याचे कृत्य मानलेले आहे. कॉपीराईटचा भंग करणारा व त्याचा मदतनीस हे या गुन्ह्यात आरोपी होतात. हा गुन्हा सिद्ध झाल्यास आरोपीस कडक शिक्षेचा तरतूद कायद्यात केलेली आहे. या गुन्ह्यास कमीत कमी सहा महिने व जास्तीत जास्त तीन वर्षे तुरुंगवासाची आणि कमीत कमी पन्नास हजार रुपये व जास्तीत जास्त दोन लाख रुपये दंडाची शिक्षा करता येते. यापेक्षा कमी तुरुंगवासाची व दंडाची शिक्षा करण्याची मुभा न्यायाधीशांना आहे. पण त्यासाठी योग्य व विशेष कारणे असावी लागतात. अशा एका गुन्ह्यात शिक्षा झालेल्या गुन्हेगाराने पुन्हा कॉपीराईट भंगाचा गुन्हा केला तर त्यास अधिक कडक शिक्षेची तरतूद कायद्यात आहे. कॉपीराईट भंगाच्या गुन्ह्याची नोंद झाल्यास पोलिस अधिकाऱ्यास जप्तीचेही अधिकार असतात.

भारतातील कॉपीराईट कायदा हा अन्य विकसित देशातील या प्रकारच्या कायद्यांच्या सर्वसाधारणपणे बरोबरीने आहे. आपल्याकडच्या पेटंट कायद्याबाबत विकसित राष्ट्रांचे बरेच आक्षेप होते व आहेत तसे कॉपीराईट कायद्यातील तरतुदीबाबत खूप प्रमाणात नाहीत. पण कायदा योग्य व चांगला असला तरी त्याची अंमलबजावणी योग्य व काटेकोरपणे होत नाही अशी अन्य राष्ट्रांची तक्रार असते. या कायद्याची अंमलबजावणी नीट न होण्याची तक्रार आता देशातील हक्कधारकांकडूनही मोठ्या प्रमाणात होऊ लागलेली आहे. व्हिडिओ - ऑडिओ कॅसेटस्, संगणक प्रोग्रॅम, जाहिरातीमधील मजकूर अशा जास्त गुंतवणुकीच्या क्षेत्रात त्यांची जाणीव अधिक होते. कॉपीराईट या बौद्धिक संपदेची व या हक्कांच्या अंमलबजावणीची जागरूकता उत्तरोत्तर वाढतच जाणार आहे.



□□□

**५३० सदाशिव पेठ, जोंधळे चौक,**
**पुणे- ४११ ०३०. दूरध्वनी- ४७८४७७**

(टीप : कॉपीराईटच्यासंदर्भात काही शंका असतील किंवा काही स्पष्टीकरणे हवी असतील तर जिज्ञासू वाचकांनी आपले मुद्दे जरूर उपस्थित करावेत. ते 'भाषा आणि जीवन' कडे पाठवल्यास ॲड. अविनाश गानू त्यांचा परामर्श घेतील व त्याचे फलित पुढील अंकातून आम्ही प्रसिद्ध करू. ***संपादक.***)

**(१९९७ हे गालिबचे द्विजन्मशताब्दी वर्ष होते. याशायराच्या काव्य प्रतिभेची दखल घेण्यासाठी हे लेखन या अंकात प्रसिद्ध करत आहोत.**
**१. पंडित आवळीकरांचे उत्स्फूर्त काव्य आणि २. सुरेशचंद्र नाडकर्णी यांचा जाणकारीने लिहिलेला लेख. *संपादक*)**

## रे गालिब

रक्ताची पवित्र नाती विटाळणारे हे पापी
मानलेली मनाची नाती काय मानतील रे गालिब
'तिथून' पिऊन आलेल्यांना हे बेवडे बोलघेवडे
पिवडे न म्हणतील तर काय म्हणतील रे गालिब

स्त्री म्हणजे भोग, दारू म्हणजे 'कैफ' समजणारे
हे बुळे वांतिलाल थोरवी काय जाणतील रे गालिब
यांनी 'भले' म्हटले काय, 'बुरे' म्हटले काय
हे बदफैली काय भले पाहतील रे गालिब

करतील स्मिते करतील जखमा न चुकता
न भरणाऱ्या जखमांत मीठ भरतील रे गालिब
सांडलेले मीठ आम्ही पण पापण्यांनी असते वेचले
पण सांडलेच नाही मीठ जखमांतील रे गालिब

आम्ही तुला 'वली' समजतो, पिण्या न पिण्याहून
'वली' पण असते वेगळ्याच जगातील रे गालिब
संपली 'सदी' दुजी, संपली 'सद्दी' ही चुगलखोर
शतके तुझे 'चरण' चुंबीत राहतील रे गालिब

**पंडित आवळीकर**
**मराठी विभाग, गुलबर्गा विद्यापीठ,**
**गुलबर्गा ५८५१०६**





अनुक्रमणिका

# ग़ालिब- एक प्रज्ञावंत शायर

सुरेशचंद्र नाडकर्णी

**क़ैदे-हयात व बन्दे-ग़म अस्लमें दोनों एक हैं**
**मौत से पहले आदमी ग़मसे नजात पाए क्यौं?**

"...आयुष्यभराची कैद - जन्मठेप - आणि दु:खाचे बंधन या दोन्ही गोष्टी वस्तुत: एकच आहेत.... जीवन म्हणजे दु:ख अन् दु:ख म्हणजेच जीवन... मग मृत्यूपूर्वी माणसाची दु:खापासून मुक्तता कधी व्हावी तरी कशी?"

ग़जल ही उर्दू काव्याची सम्राज्ञी. ग़जल हा शब्द उच्चारताच एकच नाव डोळ्यांसमोर येते, 'मिर्ज़ा असदुल्ला खाँ 'ग़ालिब'

उंच धिप्पाड बांधा, लालसर गौरवर्ण, भव्य कपाळ आणि किंचित वर आलेली गालांची हाडे त्याच्या तुर्की वंशाची साक्ष देत. लांबसडक पापण्या असलेले बदामी डोळे, विलक्षण भावदर्शी होते. उत्तमोत्तम पोशाख घालून चांदीच्या मुठीची काठी सतत हातात खेळविणारा मिर्ज़ा ग़ालिब हे अत्यंत देखणे आणि आकर्षक व्यक्तिमत्त्व होते. डोक्यावर उंच चौकोनी तुर्की टोपी किंवा क्वचित पगडी असे. युवावस्थेत नेहमीच गुळगुळीत दाढी करणाऱ्या ग़ालिबने उतारवयात छोटीशीच शुभ्र दाढी राखली होती. संगीताचा शौकीन, मदिरा-मदिराक्षी-नृत्यादि विलासी जीवनाची आसक्ती बाळगणारा ग़ालिब सरदार जाफरींच्या मते स्वभावाने इराणी, धर्माने अरबी परंतु शिक्षणाने आणि संस्कृतीने पूर्णतया भारतीय असे काहीसे गुंतागुंतीचे व्यक्तिमत्त्व होते.

अत्यंत संवेदनशील मन आणि अद्वितीय काव्यप्रतिभा हे गालिबला मिळालेले ईश्वरी वरदान होते. फारसी भाषेवर असामान्य प्रभुत्व मिळविलेल्या ग़ालिबची काव्यसाधना बालपणीच सुरू झाली. किशोरावस्थेतील ग़ालिबच्या रचना ऐकून शायरे-आजम मीर तकी मीर तकी 'मीर ' उद्गारले, 'या पोराला कुणी चांगला उस्ताद मिळालां तर हा उत्तम शायर बनू शकेल... वर्ना मुहमिल (फालतू) बकने लगेगा...' वयाची पंचविशी गाठताना ग़ालिबची कीर्ती भारतभर पसरली होती.

नशीब अजमाविण्यासाठी तुर्कस्तानातून भारतात आलेले कोकान बेग

हे ग़ालिबचे आजोबा. वडील अब्दुल्ला बेग प्रथम लखनौचे नवाब, नंतर हैद्राबादचे निजाम आणि शेवटी अल्वार नरेशांच्या पदरी असताना लढाईत मारले गेले. पाच वर्षांच्या ग़ालिबची जबाबदारी चुलते नसरुल्ला बेग यांनी स्वीकारली. परंतु चारच वर्षांचा काळ लोटतो न लोटतो तोच चुलते हत्तीवरून पडून निधन पावले. नऊ वर्षांचा ग़ालिब आग्रा येथे मातामह ख्वाजा गुलाम हुसैन कमीनदान यांच्याकडे राहू लागला. या आजोळघरीच २७ डिसेंबर १७९७ रोजी ग़ालिबचा जन्म झाला होता.

आग्रा येथील पिपलमंडी गल्लीत आजही हा मातामहांचा वाडा सुस्थितीत आहे. सध्या तेथे इन्द्रभान गर्ल्स हायस्कूल ही शाळा भरते. परंतु जेथे ग़ालिबचे अखेरपर्यंतचे आयुष्य व्यतीत झाले ती दिल्लीमधील बल्लीमारान गल्लीतील इमारत- राहते घर -मात्र आज अगदी पडक्या स्थितीत आणि विपन्नावस्थेत आहे.

आजोबांनी नातवाच्या शिक्षणाची उत्तम सोय केली. देखण्या पोरसवदा नातवाला ते लाडाने 'मिर्ज़ा नोशा' म्हणत असत. त्यांनी मौलवी मुअज्जन आणि मुल्ला अबदुस्समद या दोघांची शिक्षक म्हणून नेमणूक केली. पैकी मुल्ला अबदुस्समद नुकताच इस्लाम धर्म स्वीकारून इराणमधून भारतात आला होता. या पंडिताकडून गालिबने प्राचीन फारसी भाषा, इस्लाम-पूर्व संस्कृती, इस्लाम धर्म, सूफी वाङ्मय आणि तत्त्वज्ञान वगैरेंबाबत सखोल ज्ञान हस्तगत केले. या फारसी उस्तादाच्या प्रभावामुळेच ग़ालिबने फारसी भाषेत शेकडो रचना केल्या. 'दस्तंबो' (सुगंध) नावाचा ग्रंथ लिहिला. त्यात एकही अरबी शब्द उपयोगात आणलेला आढळत नाही.

अर्थात काही संशोधकांच्या मते मुल्ला अबदुस्समद या नावाचा कुणी शिक्षक अस्तित्वातच नव्हता. आपली फारसी भाषा अस्सल वळणाची ठरावी म्हणून ग़ालिबने हे काल्पनिक पात्र उभे केले. काहीही असले तरी ग़ालिबचे फारसी भाषेवरील प्रभुत्व निर्विवाद आहे.

वयाचे तेराव्या वर्षी गालिबचा विवाह दिल्लीतील एक नवाब इलाहीबक्ष यांच्या कन्येसमवेत झाला. दिसण्यात अत्यंत सुमार असलेली उमराव बेगम अत्यंत धर्मपरायण आणि पतिनिष्ठ होती. उलट ग़ालिब अत्यंत देखणा आणि वृत्तीने पूर्णपणे सुधारक. तो कधीच नमाज पढत नसे. रोज़े ठेवीत नसे. कर्मठपणाची

तो उघड हेटाळणी करीत असे. मात्र ईश्वरावर त्याचा विश्वास होता आणि सर्वधर्मसमभावावर त्याचा अढळ विश्वास होता.

गालिबचे स्वतःचे असे काही तत्त्वज्ञान नाही. परंतु अनेक रचनांमधून त्याने जीवनविषयक कल्पना मांडल्या आहेत. कदाचित प्राचीन सूफी काव्याचा सखोल अभ्यास केल्यामुळे रूढ धर्मकल्पनांपेक्षा वेगळा विचार करण्याची वृत्ती निर्माण झाली असावी. 'वहदत-ए-वजूद' मध्ये त्याने चराचर सृष्टी व्यापून राहिलेल्या ईश्वराची कल्पना मांडली आहे. तो अद्वैताचा पुरस्कर्ता होता. मेहर-ए-नीमरोज़ (माध्यान्हीचा सूर्य) या फारसी पुस्तकात विश्व आणि परमेश्वर एकच आहेत, नवे-जुने, नश्वरता-चिरंजीविता असे काहीच नाही, सारे भ्रम आहेत; एकामागून एक प्रलय होतच राहणार आणि पुन्हापुन्हा सृष्टीची निर्मिती होतच राहणार आणि नवे नवे पैगंबर (प्रेषित) येतच राहणार, हा सृष्टीक्रमच आहे असे त्याने प्रतिपादन केले आहे.

सृष्टीचा कर्ता करविता परमेश्वर आहे यावर त्याचा दृढ विश्वास होता आणि आपल्या नशिबात एवढी दुःखे, इतक्या अनंत अडचणी का याचे त्याला नेहमीच कोडे वाटत असे. ती स्वतःची समस्या त्याने सुरेख काव्यमय वळण देऊन एका शेरात मांडली आहे -

''परमेश्वरा (यारब) जर मी या सृष्टीत एकदाच निर्माण झालो आहे - अन् माझी दुसरी कोणतीही प्रतिकृती नाहीय तर एखाद्या पाटीवर चुकून दोनदा लिहिले गेलेले अक्षर (हर्फ -ए-मुकर्रर) जसे पुसून टाकले जाते तसे मला या जगाच्या पाटीवरून (लौह-ए-जहाँ) नाहीसा करण्यासाठी हे जग (जमाना) का इतकी खटपट करतंय?

यारब! जमाना मुझको मिटाता है किस लिये
लौहे-जहाँपे हर्फे-मुकर्रर नहीं हूँ मैं ।

ग़ालिबला नशिबाने कधीच साथ दिली नाही. बालवयातच पितृछत्र हरवले. नवाबजादा असूनही चुलत भावंडांनी फसवणूक केली. इंग्रजांनी तनख्याबाबत अनेक वर्षे चालढकल केली आणि शेवटी ग़ालिबचा रास्त हक्क डावलला. बायकोचा श्वशुरांकडून येणारा तनखा काटछाट करून अत्यंत अपुरा केला. सात मुले एका मागून एक दगावली. भाचा आरिफ याला दत्तक घेतले तो दोन

नातवंडे पदरात टाकून ऐन पंचविशीतच इहलोक सोडून गेला. धाकट्या भावाला वेड लागले. त्याचाही संसार अंगावर पडला. रुपया जेव्हां गाडीच्या चाकाएवढा मोठा होता त्या काळात गालिबला साठ हजारांपेक्षा अधिक कर्ज झाले होते पण मृत्यूपूर्वी ग़ालिबने बहुतेक सारे देणे फेडत आणले होते. केवळ सात साडेसातशे रुपयांचेच देणे राहिले होते ते त्याच्या दुसऱ्या भावाने फेडले.

ओढघस्तीच्या परिस्थितीमुळे मानी स्वभावाच्या ग़ालिबला निरुपायाने नोकरी स्वीकारावी लागली. दरमहा पन्नास रूपये तनखा घेऊन तैमुरी घराण्याचा इतिहास लिहिण्याची कामगिरी त्याच्यावर सोपविली होती. परंतु शहजादे नित्य नवनवीन काफिया-रदीफ (यमक -अंत्ययमक )घेऊन येत आणि गालिबला त्यावर लगेचच गजल रचण्यास फर्मवीत -वास्तविक अशा रचना उत्तम रचना क्वचितच होऊ शकतात. परंतु गालिबच्या प्रतिभेचा विलास पहा -

सब कहाँ कुछ लाला-ओ-गुलमें नुमायाँ हो गयीं
खाकमें क्या सूरतें होंगी जो पिनहाँ हो गयीं ।

...किती अप्रतिम लावण्ययुक्त चेहरे या मातीत (खाक) गाडले गेले असतील... त्यापैकी काही फारच थोडे गुलाबादी (गाणारी /तवायफ)(लाला-ओ-गुल) पुष्पांच्या रुपात पुन्हा प्रकट (नुमायाँ) झाले आहेत.... कोण जाणे आणखी किती एकापेक्षा एक सुंदर चेहरे (सूरतें) या मातीत छपले (पिनहाँ) गेले आहेत....''

कितीही बिकट अथवा दुःखद प्रसंग असो; गालिबचे मानसिक संतुलन कधी ढळत नसे. विलासी युवावस्थेत त्याचे एका डोमनीवर उत्कट प्रेम होते असे म्हणतात. त्याबद्दल अधिकृत पुरांवा उपलब्ध नाही. केशव दत्तच्या एका पत्रात त्याचा ओझरता उल्लेख आढळतो. त्याच्या एका गजलेवरून मात्र त्याच्या अंतर्यामीच्या विकल अवस्थेची कल्पना करता येते.

वो फिराक़ और वो विसाल कहाँ
वो शबो-रोजो-माहो-साल कहाँ?
थी वो इक शख़्सकी तसव्वुर से
अब वो रानाई-ए-खयाल कहाँ?

...कुठे हरवून गेले ते सुरेख दिवस... तो वियोग (फिराक)अन् नंतर





अनुक्रमणिका

विरही जीवांचे मीलन (विसाल) ...त्या सुंदर रात्री, (शव) ते प्रसन्न दिवस (रोज) ते ऋतू (माह-ओ-साल = शब्दश: महिने आणि वर्षे) ...सारं सारं काही....

...केवळ त्या एका व्यक्तिमत्त्वाच्या (शख्स) चिंतनाने (तसव्वुर) माझ्या विचारांमध्ये केवढी तरी प्रसन्न ज्योतिर्मयता (रानाई-ए-खयाल) असायची.... कुठे हरवून गेलं ते सारं काही....

दत्तक घेऊन पुत्रवत प्रेम केलेला आरिफ अकाली निधन पावल्यावर मात्र गालिबचे मन कळवळून उठले. अंत:करणाला पीळ पाडणारी मर्सिया (शोकगीत) वजा गजल त्याच्या लेखणीतून उतरली -

लाज़िम था कि देखो मेरा रस्ता कोई दिन और
तनहा गये क्यौं अब रहो तनहा कोई दिन और ।

''....अरे इहलोक सोडण्यापूर्वी निदान काही दिवस तरी माझी वाट पाहणे आवश्यक (लाजिम) होते ना?... मला सोडून एकटाच (तनहा) निघून गेलास ना? ....आता तेथे सुद्धा तुला काही दिवस (मी येईपर्यंत) एकट्यानेच रहावे लागेल...

हाए ! ऐ फलक-ए-पीर ! जवाँ था अभी आरिफ
क्या तेरा बिघडता जो न मरता कोई दिन और ।

...अरे वयोवृद्ध कालपुरुषा (फलक-ए-पीर = शब्दश: म्हातारे आकाश) आरिफ तर तरुण होता ना? ...आणखी थोडा थांबला असतास अन् त्याचे मरण थोडे लांबणीवर पडले असते तर तुझे असे काय मोठे बिघडणार होते?....

अन्यथा गालिबची स्थितप्रज्ञता सहसा त्याला सोडून जात नसे. त्याच्या दुर्दैवी कर्जबाजारी आयुष्यात अनेकांनी केवळ मत्सराने त्याच्यावर अतिशय कडवट टीका केली. त्याच्यावर नाही नाही ते आरोप केले गेले परंतु ग़ालिबने एका सुरेख शेरात त्याचे उत्तर दिले आहे -

'ग़ालिब' बुरा न मानिये जो दुश्मन बुरा कहे
ऐसा भी है कोई कि सब अच्छा जिसे कहे?

''....अरे शत्रू वाईट बोलले तर त्याचे काय वाईट वाटून घ्यावयाचे?... जगात असा कोण हरीचा लाल आहे की ज्याला सगळे लोक नावाजतात अन् चांगला म्हणतात?...''





अनुक्रमणिका

गालिबच्या काव्याविषयी बोलावयाचे झाले तर गालिब ध्येयमंदिरापेक्षा ध्येयमार्गाचाच चाहता होता. म्हणून कदाचित त्याने तृप्तीपेक्षा तृष्णेची अधिक प्रशंसा केलेली आढळते. हा त्याच्या काव्याचा विशेष पैलू म्हणता येईल. त्याने एकूण सुमारे अठरा हजार शेर लिहिले. त्यातील बरेचसे फारसीत किंवा फारसी प्रचुर उर्दू भाषेत आहेत आणि त्यामुळेच सर्वसामान्य रसिकांना ते अपरिचित आहेत.

गालिबला आपल्या फारसीचा विलक्षण अभिमान होता. राजकवी इब्राहीम 'ज़ौक' याला उद्देशून त्याने लिहिले आहे -

फारसी बींता व बीती नकश हाए रंगरंग
गुजर अज मज्मुआ-ए-उर्दूके बेरंगे-मन अस्त ।

''...माझ्या प्रतिभेचे पैलू पाहावयाचे असतील तर माझे फारसी काव्य पहा--- उर्दू काव्य काय बघताय्... ते फारसी रचनांच्या तुलनेत अगदीच निकृष्ट आहे....''

गालिबने भाषा सौंदर्याकडे फारसे लक्ष पुरविले नाही. फारसीच्या अभिमानामुळे सुरवातीचे बरेच काव्य फारसी-प्रचुर दुर्बोध भाषेत आहे. ते सर्वसामान्य रसिकांपर्यंत पोहोचतच नसे. लालकिल्ल्यातील एका शाही मुशायऱ्यात आगाजान 'ऐरा' याने गालिबला उद्देशून शेर पेश केले -

आपका कहा गर आप समझे तो क्या समझे
कहनेका मजा जब है कि एक कहे और दूसरा समझे ।
कलामे 'मीर' समझे और जबाने मिर्ज़ा समझे
मगर आपका कहा ये आप समझे या खुदा समझे ।

....स्वतःचे लिखाण फक्त स्वतःलाच आकलन होत असले तर काय उपयोगी? जेव्हा ते दुसऱ्या कुणाला समजेल तेव्हाच त्याचा खरा आनंद द्विगुणित होतो.... आम्हाला 'मीर' आणि 'मिर्जा' सौदाच्या रचना समजतात पण यांचे (ग़ालिबचे) काव्य एक ते स्वतः जाणोत अथवा परमेश्वर जाणो ---

'ग़ालिब' रागाने मुशायऱ्यातून उठून गेला. परंतु नंतर सासरे इलाहीबक्ष आणि परमस्नेही मौलवी फजले हक यांनी खूप समजविल्यानंतर ग़ालिबने) सुमारे बाराशे शेरांचे सोप्या उर्दूत पुनर्लेखन केले आणि आज गालिबची प्रसिद्धी आणि कीर्ती केवळ याच बाराशे शेरांमुळे आहे. त्याच्या उत्तमोत्तम रचना अद्याप रसिकांना





अनुक्रमणिका

अपरिचितच आहेत ही वस्तुस्थिती आहे.

जिवलग दोस्त हकीम मोमिन खाँ 'मोमिन' निवर्तल्यानंतर अतीव विषादाने मुन्शी नबी बक्ष 'हकीर' यांना लिहिलेल्या पत्रात त्याची उदासवाणी झालेली मन:स्थिती स्पष्टपणे जाणवते.

''....बंधो ! पहा आमची मुले आमच्या डोळ्यांदेखत जाताहेत... समवयस्क देखील सोडून चालले... दुनियेच्या धर्मशाळेत उतरलेला आमचा काफिला आता अंत्ययात्रेला निघालाय्... आम्ही देखील रिकिबीत पाय ठेवून (घोड्यावर स्वार होण्यासाठी) तयारच आहोत... ....देखो भाई ! हमारे बच्चे मर जाते हैं । हमारे हमउम्र (समवयस्क) मर जाते हैं... काफिला चला जाता है और हम पा-दर-रिक़ाब बैठे हैं....

१८५७ च्या स्वातंत्र्यसमरानंतर ग़ालिबची दारुण वाताहत झाली. पेन्शन बंद झाली. मित्र, सावकार, नवाब वगैरे शिष्यवर्ग मदत करीत तेही धामधुमीत मरण पावले. प्रकृती ढासळतच गेली. १८६६ नंतर सतत दोन वर्षे त्याने अंथरुणच धरले. अधूनमधून भान हरपत असे. विस्मृती होत असे. शुद्धीवर असताना दोन-तीन ओळीच सतत ओठांवर घोळवीत असे -

ऐ मर्गे - नागहाँ ! तुझे क्या इन्तजार है?

''.... हे अवचित येणाऱ्या मृत्यो (मर्ग-ए-नागहाँ) ! ....आता तू तरी कुणाची वाट पाहत (इन्तज़ार) थांबला आहेस?.... (ये ना लवकर....)....''

किंवा-

दमे-वापसी बर-सरे-राह है
अजीजो ! अब अल्लाह ही अल्लाह है ।

''... आता आमचा परतणारा (शेवटचा) श्वास (दम-ए-वापसी) आता शेवटच्या प्रवासाला निघालाय्.... मित्रांनो! (येतो आता...) आता फक्त परमेश्वर आणि परमेश्वरच....''

असे पुटपुटत हा अत्यंत दुर्दैवी परंतु असामान्य प्रतिभेचा प्रज्ञावंत शायर महामानव दिनांक १५ फेब्रुवारी १८६९ रोजी दुपारी तीन वाजता इहलोक सोडून गेला. उर्दू शायरीतील प्रतिभा-भास्कर कायमचा मावळला.

□□□

**८०१, भांडारकर इन्स्टीट्यूट रस्ता,**
**पुणे ४११००४**





अनुक्रमणिका

# मराठीचे चांगभले

आशा मुंडले

तर जेहेत्ते कालाच्या ठायी मराठी भाषा साधारण सातव्या शतकापासून दृश्यमान आहे. श्राव्यमान आहे. त्या जवळजवळ पहिल्याच लेखी उल्लेखात 'सामरंगे, कलहशीले' मराठी बांधवांचे वर्णन आहे. मराठी केव्हा उगवली, ती बोलणारे लोक कोण होते, पहिला पद्य ग्रंथ कोणता, पहिला गद्य ठेवा कोणता यावर विद्वानांचा कलह अर्थातच आहे. विद्वान पण मराठीच पडले ना.

पण अलीकडेच केव्हातरी असे नक्की ठरले की ही जगप्रसिद्ध भाषा आहे. तिच्या जागतिक परिषदा भरवल्या पाहिजेत. मराठी प्रेमाचे सरकारी उत्सवही केले पाहिजेत. राजभाषादिन आणि महाराष्ट्र स्थापनादिन १ मेला दणकून साजरे करावे. आता पुढचे ध्येय म्हणजे एकदम मराठी लेखकाला वाङ्मयाचे नोबेल प्राईज.

त्यासाठी तुकारामाचे नाव चित्र्यांनी सुचवले असे म्हणतात. या पुरस्कार समितीवर शंकर सारडांना घ्यावे असे सारडांनीच सुचवल्याचीही लेखकांमध्ये कुजबूज आहे.

पूर्वी मराठीची काळजी करणे हा साधारणपणे कुटिरोद्योग होता. त्यात भांडखोर आवेश आधीचाच होता.''संस्कृत देवानी केली आणि प्राकृत काय चोरानी केली की काय ?'' हे सात्त्विक संतापाचे पाहिले ज्ञात उद्‌गार.

ह्या काळजीमध्ये ''मराठी बुडणार'' जर अमुक केले नाही तर ! असा राजवाड्यांचा आक्रोशही समाविष्ट आहे. ह्या काळजीचे 'घराणे' अजून चालू आहे. दरवर्षी एकदोनदा या घराण्याचे लेखक, कवी, विचारवंत आक्रोश करतात. खंत करतात आणि याला काही इलाज नाही असे विषण्ण उद्‌गार काढून थांबतात. मराठी दरबारात फाटकी वस्त्रे नेसून उभी आहे हा त्यातला एक अलीकडचा दागिना हा तर विश्वविख्यात माणसाचा निर्वाळा या माणसाच्या नाावाने एक 'तारा' आहे विश्वात. या 'स्थिती' बद्दल मराठीचे प्रपितामह किंवा पणिनी (या पदव्या आम्हीच बहाल केल्या आहेत. त्या रूढ होण्याची खात्री बाळगून आहोत. त्या रूढ झाल्या नाहीत तर तो जनतेचाच अपराध असेही आधीच सावधपणे मानून ठेवत आहोत) प्रा. डॉ. अशोक रा. केळकर सरकार, लोक, वगैरे ना (म्हणजे ते स्वतः सोडून जवळ जवळ सर्वानाच) जबाबदार धरतात. मात्र अजूनही





अनुक्रमणिका

'डॉ.' बद्दल त्यानी प्रतिशब्द सुचवलेला नाही.

सुदैवाने हे एकच 'घराणे' मराठी भाषागायनात नाही. ''खिळामाजी रत्नखिळा'', ''पुष्पामधे मोगरा'' अशी वारवाणणी करणारे होऊन गेले. त्यांची परंपरा चालू आहे. आणि त्यांची श्रद्धा अशी की इतकी चांगली भाषा मरलच कशी? जरा शहरी मध्यमवर्गीय झापडे डोळ्यावरून काढा की जिवंत रसरशीत मराठी महाराष्ट्रभर भेटेल असे या घराण्याचे लोक म्हणतात पण त्यांचा वशिला कमी पडत असावा. त्याना आक्रोशगायकांइतकी प्रसिद्धी व कीर्ती नाही.

यांच्यापैकी काहीजण''उपायवादी'' आहेत. म्हणजे जणु काही भावगीत गायकांसारखे. लोकांना शास्त्रीच संगीत जड वाटते ना? करा थोडी तडजोड आणि गा भावगीत किंवा नाट्यसंगीत याच पद्धतीने हे उपायवादी मराठी सोपी करू इच्छितात. श्रीमान मधुकर गोगटे याना रोमन लिपी वापरून मराठी सोपी करायची आहे. एका मला अज्ञात असलेल्या नावाच्या माणसाला बेसिक इंग्लिशप्रमाणे मराठी ८०० शब्दांची करायची होती. तेवढ्या भावना, कृती, विचार पुरतील सामान्य माणसाना म्हणे. आणि विद्वानांसाठी देववाणी राखून ठेवायची होती.

आणखी काहीना वाटते की ते स्वतः सोडून इतर सर्वानी मुले मराठी माध्यमात शिकायला घालावी. हा कसला उपाय? हेच लोक म्हणतात माझे भाचे, पुतणे, मुलंगे सोडून इतरानी अमेरिकेत स्थाईक होऊ नये. पण असले उपाय हे उपाय नसून पळवाटाच आहेत. मला तर वाटते असे बोलायला पाच वर्षे बंदी घातली तरी कोणा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ चे बिथडणार नाही. मराठीचे तर नाहीच नाही.

आणखी एक -- प्रवाह 'आर्थिक' आहे. प्रा. गंगाधर गाडगीळ आणि तत्सम इतर सुखवस्तू तर म्हणतात की मराठीची आर्थिक बाजू भक्कम झाली की मराठी फोफावेलच. उदाहरण इंग्रजीचे. जगभर ती साम्राज्यातून पसरली. तिची काळजी न करताच ती रशिया, चीनमध्येही पोचली. उद्या चंद्रावरही जाईल.

यांच्या म्हणण्यात काही तथ्य जरूर आहे पण आता भौगोलिक साम्राज्यापेक्षा वैचारिक साम्राज्याचा जमाना येतो आहे. एवढी दुरुस्ती त्यात हवी. जर मराठी बोलणाऱ्यातून मराठीत लिहिणारे कुणी गांधी वा मंडेला झाले तर ते जगभर पोचतीलच. त्यांना वाचायला इतर जग मराठी शिकेल. त्यांचे भाषांतर करायलाही मराठी लागेलच.

भाषा जगते बोलण्याऱ्यांमुळे आज निदान सात कोटी लोक मराठी बोलतात.

ही संख्या अजिबात लहान नाही. या सर्वांची आर्थिक प्रकृती सुदृढ झाली तर मराठी नक्कीच जगेल.

भाषेला इतिहास, परंपरा, व्यक्तिमत्त्व असते. ते काळाच्या ओघात बदलते. पण भाषा 'मरणे' फार अवघड असते. इंग्रजी माध्यमाच्या शाळा वाढल्या तर मराठी मरणार नाही. उलट कालांतराने त्या शाळातील इंग्रजीचे मराठीकरण होईल. 'इंडियन इंग्लिश' आज जगन्मान्य-- आहे. तसे हे 'मराठींग्लिश' पण मान्य होईल. प्रश्न सर्जनशीलतेचा असतो.

उदाहरणार्थ आज इंग्लंडमधला रॉक-भांगड किंवा आधुनिक अध्यात्मपंथ हे जसे संस्कृतीचे नवे अंकुर आहेत तशीच मुळात मराठी हाच प्राकृताचा नवा अंकुर आहे.

तर्कशास्त्रात एक कोडे असते. एक छत्री आहे. तिचा प्रथम दांडा बदलला, मग कापड बदलले, मग मूठ बदलली, नंतर मालकही बदलला पण तरी मुळात 'त्याच' छत्रीचे सातत्य गृहीत आहे. भाषेचेही जवळजवळ तसेच असते.

मराठी बोलणारे लोक आहेत तोवर मराठी राहीलच. शासन, विद्यापीठे या मूळ वृक्षाला खतपाणी घालू शकतात किंवा अविचारी धोरणाने त्याच्या फांद्या, पाने छाटू शकतात. पण त्याचे जगणे वा मरणे त्यांच्या हातात नाही.

□□□

**१६३/१६, डी.पी.रोड,**
**पुणे ४११००७**

---

## गुणिले म्हणजे जन्मले!

अक्षयची पहिलीच्या वर्गात जाण्याची तयारी सुरू झाली. अभ्यास - त्यातही लहान मुलांचा अभ्यास - म्हणजे डोक्यावर मोठं ओझं देऊन बसविल्यासारखं वाटतं. विशेषतः पालकांना तसं वाटतं. खरं म्हणजे तसं काही नसतं.

अक्षयला पाढे शिकवायला सुरुवात केली. पहिले तीन चार दिवस त्यानं पाढे मुकाट्यानं म्हटले. लिहिले. पाचव्या दिवशी त्यानं पाढे लिहिता लिहिता आईला विचारलं,

''दोन गुणिले चार म्हणजे आठ
गुणिले म्हणजे जन्मले काय?''

**प्रेषक**
**मानसी अ. यार्दी**
**मराठा गल्ली, मनकिल्ला धारवाड**

# भाषाविज्ञानाचे एक नमुनेदार उपयोजन

**सत्त्वशीला सामंत**

विविध क्षेत्रांत होणारा मराठीचा वापर अधिकाधिक गुणवत्तापूर्ण होत जावा यासाठी प्रयत्नशील राहणे व मराठी भाषेच्या अभिवृद्धीची प्रक्रिया नियोजनपूर्वक गतिमान् करणे ही 'राज्य मराठी विकास संस्थे' च्या निर्मितीमागील मुख्य उद्दिष्टे होत अशी भूमिका संस्थेच्या माहितीपत्रकात मांडलेली आहे. तीस अनुसरून 'राज्य मराठी विकास संस्थे'ने वरील पुस्तक १९९६ साली प्रसिद्ध केले ही गोष्ट खचितच अभिनंदनीय आहे. आधुनिक भाषाविज्ञानाचे अभ्यासक अनेक असले तरी, प्रत्यक्षात एखाद्या व्यावहारिक क्षेत्रात त्या तत्त्वांचे उपयोजन करण्याचा प्रयास क्वचितच झालेला आहे. डॉ. श्रीमती गीता भागवत यांनी 'प्रशासनिक भाषा' या वर्तमानकाळातील अत्यंत जिव्हाळ्याच्या विषयाला हात घातला आणि त्या विषयाचा जो सांगोपांग अभ्यास केला त्यातून हे पुस्तक साकार झाले.

महाराष्ट्राच्या राज्यकारभाराचे मराठीकरण करण्याची जबाबदारी सोपवण्यात आलेल्या 'भाषा संचालनालय' या विभागात डॉ. भागवत यांची १९७७ सालच्या सुमारास, प्रथम अनुवादकपदावर नेमणूक झाली होती. (याच कार्यालयात पुढे १९९१ साली त्या 'सहायक संचालक' पदावरून स्वेच्छानिवृत्त झाल्या.)१९७७ नंतरच्या त्यांनी पीएच्. डी. साठी हा विषय निवडला. त्यामुळे सरकारी यंत्रणेच्या अंतर्गेटातच त्यांना प्रवेश मिळाल्यासारखा झाला. या संधीचा पुरेपूर फायदा उठवून त्यांनी विद्यापीठ व मंत्रालय या दोहोंच्या दप्तरांचा चिकित्सकपणे व परिश्रमपूर्वक धांडोळा घेतला असे दिसते. मूळ संशोधन १९७७ -८० या काळात झाले असले तरी १९९४ साली ते 'राज्य मराठी विकास संस्थे'च्या संचालिका डॉ. सरोजिनी वैद्य यांच्यासारख्या रत्नपारखी व्यक्तीच्या हातीं लागले व त्यांच्या संस्थेने गुणग्राहकता दाखवून ते प्रकाशात आणले.

या पुस्तकात प्रथमतः लेखिकेने भाषावैज्ञानिक दृष्टिकोणातून निरनिराळ्या भाषाप्रकारांची चर्चा केली असून, उपयोजकनिष्ठ व उपयोजननिष्ठ अथवा सामाजिक, भौगोलिक व व्यवसायमूलक अशा विविध निकषांवर आधारित वर्गवारीचा ऊहापोह





अनुक्रमणिका

केला आहे. त्यातूनच मग काळाच्या ओघात पाश्चात्त्य भाषाविज्ञानात 'इडिओलेक्ट', 'डायालेक्ट', 'जार्गन', 'रजिस्टर' इ. परिभाषा कशी विकसित होत गेली ते सांगून, आपण स्वतः प्रशासनिक भाषेला 'रजिस्टर' म्हणजे 'कार्यक्षेत्रविशिष्ट भाषाप्रकार' या कोटीत का बसवतो त्याचे साधार विवेचन केले आहे. ताण्याबाण्यांनी म्हणजे उभ्याआडव्या धाग्यांनी ज्याप्रमाणे एखादे वस्त्र विणले जाते त्याप्रमाणे प्रशासनिक भाषेतही उभी-आडवी स्तररचना होत असते. प्रशासनातील सर्वोच्च पातळीवरील वरिष्ठ अधिकाऱ्यांचे आपापसांतील दळणवळण, वरिष्ठ अधिकारी व कनिष्ठ कर्मचारी यांच्यांतील संवाद आणि कर्मचाऱ्यांचा आम जनतेशी होणारा संपर्क या सर्व स्तरांवरील भाषेत तांत्रिक, निमतांत्रिक व अतांत्रिक असे स्तर दिसून येतात. याउलट, भौगोलिक दृष्ट्या मुख्यालयाच्या आसपासच्या प्रदेशातील प्रशासनिक भाषा मुख्यालयापासून, दूर जाऊ लागली की स्थलपरत्वे बदलू लागते व राज्याच्या सीमाभागांत तर, तिला नजिकच्या दुसऱ्या राज्याच्या भाषेचा वाण लागतो. म्हणून मंत्रालयीन भाषेत ज्याला 'नोंदणीकृत' ('नोंदीव' अधिक चांगला) म्हणतात, त्यास मध्यप्रदेशाला लागून असलेल्या नागपुराकडे 'पंजीकृत' म्हटले जाते; ज्याला इकडे 'नियतवाटप' म्हणतात त्यास गडचिरोली भागात 'आबंटन' म्हणतात. याप्रमाणे प्रशासनिक भाषेच्या संमिश्र स्वरूपाचा वेध घेऊन लेखिकेने या भाषेला 'अतांत्रिक कार्यक्षेत्रविशिष्ट भाषाप्रकार' ठरवले आहे. मात्र अशा भाषेला 'निमतांत्रिक' म्हणणे अधिक योग्य झाले असते असे वाटते.

२ ऱ्या प्रकरणात लेखिकेने प्रशासनिक मराठीच्या पूर्वपरंपरेचा आढावा घेतला असून, बदलत्या राजकीय परिस्थितीच्या व सत्तांतरांच्या संदर्भात प्रशासनिक मराठी क्रमशः कशी बदलत गेली त्याचे यथार्थ वर्णन केले आहे.

३ ऱ्या प्रकरणाच्या पूर्वार्धात श्रीमती भागवत यांनी विसाव्या शतकाच्या प्रारंभापासून ते १९६० सालापर्यंत मराठीच्या एकंदर अभिवृद्धीबद्दल विद्वानांमध्ये झालेल्या चर्चा व त्यांच्यामध्ये झडलेले वादविवाद यांचा समतोल आढावा घेतला आहे. कॅ. जॉर्ज जर्विस हा इंग्रज अधिकारी, विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर, केशव कृष्णाजी गोखले, ह. ना. आपटे, न. चिं. केळकर, वि. का. राजवाडे या सर्वांनी भाषा सुबोध असण्यावर भर दिला होता. १९२४ ते १९५०-५१ पर्यंतच्या काळातील स्वा. सावरकरांनी भाषा-लिपिशुद्धीची चळवळ,

माधवराव पटवर्धनांसारखे त्यांचे समर्थक व श्री. के. क्षीं.सारखे विरोधक, इ. साऱ्या घटनांचा निर्देश येथे केलेला आहे. १९५० ते १९६० या दशकातील काही महत्त्वाच्या घडामोडींच्या निवेदनात मात्र एक दोन त्रुटी राहून गेल्या आहेत असे दिसते. १९४९ साली मुंबई सरकारने काकासाहेब कालेलकरांच्या अध्यक्षतेखाली लिपिसुधारणा व प्रशासनिक भाषा यासंबंधी एक समिती नेमली होती. स्वा. सावरकरांनी लिपीविषयी सुचवलेल्यांपैकी तीन-चतुर्थांश सुधारणा तिने स्वीकारल्याचा उल्लेख आहे, पण प्रशासनिक भाषेविषयीच्या अन्य शिफारशींचा उल्लेख राहून गेलेला दिसतो. तसेच, अनेक ठिकाणीं 'सरकारी भाषा मंडळ अहवाल' १९५६ (अनुवाद) याचा हवाला दिला आहे. पण हे मंडळ नेमके कोणते त्याचा निर्देश नाही. वस्तुस्थिती अशी की, १९५५ साली भारत सरकारने 'केंद्रीय राजभाषा आयोगा'ची नियुक्ती केली. १९५६ साली महाराष्ट्रासारखे एक-दोन अपवाद वगळता, भाषावार प्रांतरचना अमलात आली. १९५६ सालीच आयोगाचा अहवाल बाहेर आला. (त्याचाच अनुवाद महाराष्ट्र सरकारच्या दप्तरात उपलब्ध असावा.) त्यानंतर राष्ट्रपतींनी त्या अहवालावर अभिप्राय व्यक्त करण्यासाठी एक 'संयुक्त संसदीय समिति' नेमली, १९५९ साली त्या समितीने आपला अभिप्राय सादर केला व दि. २७ एप्रिल १९६० रोजी राष्ट्रपतींनी त्यानुसार केंद्रीय राजभाषेसंबंधी आदेश जारी केला. त्याच सुमारास १९५९ साली तत्कालीन मुंबई सरकारनेही त्या अहवालाच्या संदर्भात 'राजभाषा समिति' नेमली. १९६० साली त्या समितीचा अहवाल प्रसिद्ध झाल्याचे कळते. परंतु या समितीच्या शिफारशींचा या पुस्तकात उल्लेख आढळला नाही.

१९६० सालानंतर भाषा संचालनालयाची स्थापना करून, महाराष्ट्र सरकारने मराठीकरणाच्या दिशेने कोणती पावले उचलली याचा मात्र लेखिकेने उत्कृष्ट आढावा घेतला आहे. प्रारंभीच्या काळात महाराष्ट्र सरकारने 'पदनामकोश' प्रसिद्ध केल्यानंतर, त्यातील अपरिचित संज्ञांना बुजून गेल्याने, कित्येकांनी त्यांची 'अपरिचयात् अवज्ञा' केली व आचार्य अत्रे यांनी त्याच्यावर टीकेची झोड उठवून त्याला पुरता 'बदनामकोश' करून टाकला हा इतिहास सर्वज्ञात आहे. म्हणून राजभाषा विकसित करण्यासंबंधीची शासनाची भूमिका स्पष्ट करण्यासाठी सरकारने 'शासनव्यवहारात मराठी : समस्या, स्वरूप व प्रक्रिया' हे पुस्तक प्रसिद्ध केले.

श्रीमती भागवत यांनी त्याही पुस्तकाचा यथोचित परामर्श घेतलेला आहे.

४ थ्या प्रकरणात १९६० ते ९५ पर्यंत ३५ वर्षांतील वाटचालीचा परामर्श घेण्यात आला असून, प्रशासनिक भाषेतील शब्दयोजना, वाक्यरचना व लेखनधाटणी यांची वैशिष्ट्ये नमूद करण्यात आली आहेत.

५ व्या प्रकरणात, भाषाविज्ञानातील communication ही संकल्पना प्रशासनिक मराठीच्या संदर्भात कितपत साकार झाली आहे त्याची लेखिकेने चर्चा केली आहे. Communication याचा अर्थ संदेशप्रेषकाला अभिप्रेत असलेला आशय त्याच स्वरूपात संदेशग्राहकाला प्रतीत होणे असा आहे. या ठिकाणी सरकार व जनता यांच्यांत असा संवाद घडून येतो काय हे तपासून पाहण्याचा लेखिकेचा प्रयत्न आहे. या शब्दशक्तीला त्यांनी 'संवादसंस्थापनक्षमता' अशी पारिभाषिक संज्ञा वापरली आहे. (भाषेच्या सोपेपणाचा आग्रह धरणाऱ्या लेखिकेने उपर्युक्त प्रदीर्घ संज्ञेचा एकदा खुलासा केल्यावर नंतर सोयीसाठी मध्यमपदलोपी समास करून 'संवादक्षमता' सारखी सुटसुटीत संज्ञा वापरली असती तर ते अधिक सयुक्तिक दिसले असते!)

प्रकरणाच्या उत्तरार्धात त्यांनी दुर्बोध वाटणारे भाषिक नमुने उद्धृत करून त्यांच्या जोडीला सुबोध असे पर्यायी मसुदे दिले आहेत. त्यातूनच शब्दांची अपरिचितता, बोजडपणा, अयथार्थता आणि संयुक्त, मिश्र वाक्यांची दीर्घता या गोष्टीचा संवादस्थापनात अडथळा निर्माण होतो असा निष्कर्ष काढला आहे.

प्रकरण ६ मध्ये भाषिक नियोजनाची चर्चा केली आहे. प्रशासकीय भाषा ही तांत्रिक स्वरूपाची असल्याने ती काही अंशीं दुर्बोध असणे अपरिहार्य आहे हा शासनाच्या प्रवक्त्यांचा दावा आहे. ('शासनव्यवहारात मराठी....'), तर तिचा जनतेशी संपर्क येत असल्याने ती अतांत्रिक स्वरूपाची आहे व म्हणूनच ती सुबोध असावयास हवी हा लेखिकेचा प्रतिदावा आहे. सत्य कोठेतरी या दोन टोकांच्या दरम्यान असावे. प्रशासकीय भाषेत अनेक स्तर असल्याने व विशेषत: त्यातील कायद्यांची भाषा ही विशेष काटेकोर असणे अपेक्षित असल्याने ही भाषा निमतांत्रिक स्वरूपाची ठरते. त्यामुळे काही अंशीं नवशब्दनिर्मिती व भाषेचे नियोजन अपरिहार्य ठरते. हे मात्र लेखिकेलाही मान्य आहे.

स्वा. सावरकरांनी 'भाषाशुद्धि चळवळी'च्या ओघात एके ठिकाणी असे

म्हटले होते की ''एकाने काढलेला स्वकीय नवा शब्द बोजड वाटेल तर दुसऱ्याने दुसरा योजावा. जो तगेल तो जगेल. आपले शब्द मारून अनावश्यक परकीय शब्द भाषेत व साहित्यात घुसू देऊ नयेत...'' परंतु महाराष्ट्र शासनाच्या भाषिक प्रवक्त्यांनी सावरकरांचे अनुकरण करून निर्माण केलेले काही संस्कृतप्रचुर शब्द दंडसत्तेच्या आधारे रूढ करण्याचा प्रयत्न केला, त्यामुळे काही काळ, तरी **'Bad money drives good money out of circulation'** या तत्त्वाप्रमाणे अशा बोजड शब्दांची सरशी झाली. ('विधि', 'शक्ति', 'उपबंध', अशा शब्दांनी मधल्या काळात अक्षरशः धुमाकूळ घातला.) महाराष्ट्र शासनाच्या डोक्यावर पुन्हा 'अखिल भारतीय एकरूप शब्दावली'चे भूत बसले होते. शक्यतो सर्व राज्यांनी समान परिभाषा विकसित करावी असे केंद्र शासनाचे मार्गदर्शक तत्त्व होते ही बाब खरी असली तरी, द्राविड भाषांनी हे तत्त्व केव्हाच झुगारून दिले होते, तर आमच्या स्वामीनिष्ठ सरकारने स्थानिक जनतेची पर्वा न करता, हे तथाकथित बंधन स्वतःवर उगाचच लादून घेतले परिणाम असा झाला की, महाराष्ट्र सरकारचे भाषिक धोरण सामान्य जनतेत अप्रिय झाले. ही बाब विशेषतः कायद्यांच्या अनुवादांच्या बाबतीत अधिकच सत्य ठरली आहे. (आता १९०८ साली भाषा संचालनालयाला जाग आली असून, 'संविधाना'चा अनुवाद सुगम करण्याची प्रक्रिया सुरू झाली आहे!)

१९४८ सालाच्या आसपास इंग्लंड-अमेरिकेत, कायद्याची भाषा ही शब्दबंबाळ असू नये, वाक्यरचना जटिल, क्लिष्ट व गुंतागुंतीची असू नये, त्या भाषेने व्हिक्टोरियन शैलीचा त्याग करावयास हवा अशी चळवळ सुरू झाल्याचा उल्लेख लेखिकेने केला आहे. यासंबंधात त्यांनी न्या. चंद्रचूड व श्री. नानी पालखीवाला यांचीही मते उद्धृत केली आहेत. हा सर्व मजकूर महाराष्ट्र सरकारच्या विधि व न्याय खात्याच्या अधिकाऱ्यांनीही अभ्यासावयास हवा. इंग्लंड-अमेरिकेत नवे वारे वाहू लागल्याची गंधवार्ताही येथील कायद्यांच्या मसुदाकारांना नसावी, किंबहुना ती लागली तरी, भाषिक पूर्वजांनी आखून दिलेली चौकट बदलण्याचे कष्ट त्यांनी घेऊ नयेत याचे रहस्य कशात आहे? आठव्या प्रकरणात पृ. २३० वर 'निष्काळजीपणा' या सदराखालील परिच्छेदात लेखिकेने या रहस्यावर नेमके बोट ठेवले आहे. (या परिच्छेदाला 'निष्काळजीपणा' ऐवजी 'बौद्धिक आळस'

असा मथळा देणे योग्य झाले असते!) ''नव्याने विचार करून मसुदा लिहिण्याचे कष्ट न घेता तत्सम प्रकरणाच्या मागील फाइलीवरून... जसेच्या तसे उतरवून काढण्याच्या वृत्तीमुळे.... ---सदोष लेखन केले गेल्याची उदाहरणे'' त्यांना आढळली. विधि व न्याय विभागातील नोकरशाहीची नेमकी हीच मनोवृत्ती होती. 'महाराष्ट्र राजभाषा अधिनियम १९६४' यातील कलम ५ अनुसार लवकरात लवकर कायद्यांची भाषा मूलतः मराठी होईल असे आश्वासन विधिमंडळाने दिले होते, फक्त मराठीतून कायदा करण्यासाठी आवश्यक ती पूर्वतयारी करण्यास अवधी मिळावा म्हणून हे कलम तात्पुरते स्थगित ठेवण्यात आले. परंतु आपणांस मराठीतून स्वतंत्रपणे कायद्याचा मसुदा तयार करण्याचे बौद्धिक कष्ट घ्यावे लागू नयेत म्हणून त्या विभागाच्या वरिष्ठ अधिकारीवर्गाने मोठ्या चलाखीने नाना सबबी सांगून हे कलम दडपून ठेवले व तीस वर्षांपर्यंत ते अमलात येऊ दिले नाही. ३० वर्षांनंतर युति शासनाच्या कारकिर्दीत दि. १५ ऑगस्ट १९९५ रोजी हे कलम अमलात आले. पण अजूनही वास्तवात विधि-न्याय खात्यात कायद्याचा मसुदा प्रथम इंग्रजीत तयार केला जातो व भाषा संचालनालयाकडून त्याचे मराठी भाषांतर करवून घेतले जाते, फक्त कायदेशीर तरतुदीचे पालन करण्यापुरती मराठी मसुद्याखाली विधि-सचिवांची स्वाक्षरी असते. याचा निष्कर्ष असा की, विधि-न्याय खात्यातील मसुदाकारांनी (नव्हे 'प्रारूपकारांनी') कायद्याचे इंग्रजी मसुदालेखन बदलण्याचे कष्ट तर घेतले नाहीतच, शिवाय कोकिळेने आपली अंडी कावळीच्या घरट्यात उबवून घ्यावीत त्याप्रमाणे मराठी मसुद्याचे मातृत्व भाषा संचालनालयाच्या गळ्यात मारले आहे आणि त्याचे पितृत्व मात्र ते स्वतः उजळ माथ्याने मिरवीत आहेत!

१९७९ साली 'राजभाषा वर्षा'त तत्कालीन भाषा संचालक श्री. य. शं. कानिटकर यांनी परिभाषा कृत्रिम असणे अटळ आहे असा अभिप्राय व्यक्त केला असला तरी, शास्त्र व तंत्रज्ञान क्षेत्रांतील भाषाही शब्दयोजना व शैली या दोन्ही दृष्टींनी सामान्य माणसाच्या आकलनापलीकडची नसावी असा मतप्रवाह अलीकडे प्रबळ होऊ लागला आहे.

महाराष्ट्र सरकार ज्या सावरकरांच्या भाषाशुद्धीचा वारसा सांगते त्या सावरकरांनाही लुप्तप्राय झालेल्या जुन्या शब्दांचे वावडे नव्हते. (पृ. ५३- ''जुन्या ग्रंथांतून व खेड्यापाड्यांतून जीव धरून असलेले मराठी शब्द पुनः प्रचारात

आणण्याकडे प्रबोधनकार ठाकरे यांच्यासारख्या लेखकाचा ओढा होता याचे ते (सावरकर) स्वागत करतात आणि अशा स्वकीय, सुटसुटीत नि सकस जुन्या मराठी शब्दांची आम्हांलाही नव्या बोजड शब्दांपेक्षा अधिक गरज आहे असे ते सांगतात.'') केवळ परिभाषेचा विकास म्हणजे भाषेचा विकास नव्हे असे सांगून लेखिकेने ती परिभाषा मराठी भाषेच्या धाटणीत, व्याकरणिक रचनेत चपखलपणे बसली पाहिजे अशी आवश्यकताही प्रतिपादन केली आहे.

प्रकरण ७ मध्ये अनुवादाची अनिवार्यता कितपत असते व त्याची प्रक्रिया कशी असावी याची चर्चा करण्यात आली आहे. शासन व्यवहारातील मराठी क्लिष्ट होण्याचे प्रमुख कारण म्हणजे ती प्रामुख्याने अनुवादित स्वरूपात वापरली जात आहे असे १९७९ साली तत्कालीन भाषा संचालकांनी एका मुलाखतीत सांगितले होते. या विधानात बरेच तथ्य आहे. पण त्यानंतरच्या काळात बऱ्याच अंशीं अनुवादित मराठीचे प्रमाण कमी झाले. तथापि, केंद्रीय कायदे, केंद्र सरकारचे अहवाल इ. केंद्र सरकारशी संबंधित गोष्टीच्या संबंधात अनुवादप्रक्रिया अपरिहार्य ठरते व त्या दृष्टीने हा अनुवाद कृत्रिम कसा होणार नाही याची काळजी घेणे जरूर आहे. प्रशासनिक मराठी हा ललितेतर भाषाप्रकार असल्याने या प्रांतात शब्दानुवाद अपेक्षित आहे, परंतु ही भाषा आम जनतेला जवळची वाटावयास हवी असेल तर, त्यामध्ये भावानुवादाचे मिश्रण करावयास हवे ही लेखिकेची सूचना स्वागतार्ह आहे.

८ व्या प्रकरणात प्रशासनिक मराठीच्या विद्यमान स्वरूपाची चिकित्सा करताना श्रीमती भागवत यांनी भाषिक व त्याचप्रमाणे भाषिकेतर कारणांचाही शोध घेतला आहे. शासनाचे भाषेविषयीचे दुराग्रही व म्हणून अग्राह्य असे धोरण, मार्गदर्शक ग्रंथांचा अपुरेपणा, शालेय/विद्यापीठीय स्तरावर कार्यमूलक (व्यावहारिक) भाषाशिक्षणाचा अभाव, प्रमाणभाषेचा अपुरा परिचय, सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षणाचा अभाव, तर कधी भाषाशुद्धीचा अतिरेक, विद्वत्ताप्रदर्शनाच्या हौसेपोटीं संस्कृतप्रचुर शब्दावडंबर व शब्दबंबाळ शैली, प्रशासनयंत्रणेशी इमान राखण्याच्या भूमिकेतून संदिग्ध, व्द्यर्थी भाषाशैली, इंग्रजीचे अंधानुकरण, इ. अनेक कारणांमुळे प्रशासनिक मराठी भाषा दुर्बोध झाली आहे असे त्या म्हणतात.

९ व्या प्रकरणात 'उपसंहार' करताना, डॉ. भागवत यांनी आधीच्या





अनुक्रमणिका

सर्व प्रकरणांचा गोषवारा देऊन, त्यांचे सार संकलित स्वरूपात दिले आहे व अखेरीस प्रशासनिक मराठीच्या नियोजनाच्या दृष्टीने काही उपयुक्त सूचनाही केल्या आहेत.

संपूर्ण पुस्तकाचा आढावा घेतला असता काही ठळक गोष्टी जाणवतात. डॉ. (श्रीमती) गीता भागवत यांनी भाषावैज्ञानिक तत्त्वे 'प्रशासनिक भाषा' या व्यवहारक्षेत्राला लागू करून, त्यांचा व्यावहारिक पडताळा घेतला आहे. या ओघात त्यांनी अगदी शिवकाळापासून ते आजतागायत प्रशासनिक मराठीच्या विविध स्थित्यंतरांचा ऐतिहासिक आलेख काढला असल्याने, भाषाइतिहासाच्या दृष्टीने हा एक मौलिक ग्रंथ ठरला आहे यात शंका नाही. परंतु केवळ इतिहासलेखनावर समाधान न मानता, सांप्रतच्या काळात या भाषाभ्यासाची उपयुक्तता काय आहे त्याचेही त्यांनी दिग्दर्शन केले आहे. आचार्य अत्र्यांचे एक वाक्य त्यांनी उद्धृत केले आहे - ''जो इतिहासाला दडपतो त्याला इतिहास दडपल्याशिवाय राहत नाही---- (पृ. १८५) म्हणून हे पुस्तक आजच्या काळात अधिकच प्रस्तुत ठरते. विद्यमान प्रशासनिक मराठीच्या दुर्बोधतेची कारणमीमांसा करताना, त्यांनी कोशवाङ्मयाचे स्थान व कोशांबाहेर होणारा शब्दांचा वापर यांची समतोल चिकित्सा केलेली दिसते. महाराष्ट्र सरकारने तयार केलेले 'शासन व्यवहार कोश' व इतर परिभाषा कोश यामध्ये कठिण शब्दांची किती अल्पसंख्या आहे याला विशेष महत्त्व नाही. काही नवे शब्द केवळ अपरिचयामुळे कठिण वाटतात. वारंवार वापरामुळे तो कठीणपणा कालांतराने जाणवेनासा होतो. (उदा. 'सचिवालय' चे 'मंत्रालय' हे नामांतर). परंतु काही अंगभूत कठीण शब्द कितीही अल्पसंख्य असले तरी, डॉ. अशोक केळकरांनी म्हटल्याप्रमाणे, ''भात खाताना लागलेले खडे लक्षात राहतात, पोटात गेलेल्या शितांची कोणी मोजदाद करीत नाही.'' काटेकोर व तरीही सुबोध परिभाषा घडवणे म्हणजे आखुडशिंगी व बहुदुधी गाय पैदा करण्याइतके अवघड असल्याने शासनाने परिभाषा कोशांसोबत सोदाहरण अर्थविवरण करणारे लघुकोश प्रसिद्ध करावेत असे डॉ. केळकरांनी सुचवले आहे. (पृ. ७२) तसेच, कोशांमध्ये हे कठीण शब्द एकांड्या शिलेदारांसारखे आले असले तरी, कोशाबाहेर एखाद्या मजकुरात जेव्हा त्यांची वारंवार पुनरावृत्ती होत राहते तेव्हा तर ते फारच खटकतात. त्याचप्रमाणे एकट्यादुकट्या कठीण शब्दांपेक्षा,

मराठीच्या प्रकृतीला न मानवणारी अतिदीर्घ, गुंतागुंतीची वाक्यरचना करण्यामुळे भाषेची दुर्बोधता वाढते. या संदर्भात प्रकरणाच्या अखेरीस लेखिकेने 'भाषा चिकित्सालय' स्थापन करण्याची सूचना केली आहे. त्यामध्ये (अ) सुबोधता चाचणी केंद्र, (आ) दुर्बोधता उपचार केंद्र, (इ) (दुर्बोधतेसंबंधी) संशोधन केंद्र अशा तीन शाखा असाव्यात असे त्या म्हणतात. शास्त्रीय दृष्ट्या ही सूचना योग्य असली तरी, सध्याच्या जमान्यातील भोवतालची परिस्थिती पाहता, ही सूचना अमलात येण्याची शक्यता फारशी दिसत नाही. माझ्या मते, या ग्रंथानेच संकल्पित 'चिकित्सालया'ची कामगिरी पार पाडली आहे. निरनिराळ्या मजकुरांची दुर्बोधता जोखून त्यांचा दुर्बोधता निर्देशांक काढण्यासाठी त्यांनी स्वत:च एक भाषाशास्त्रीय वस्तुनिष्ठ कसोटी तयार केली असून, परिशिष्ट दोन व तीन मध्ये त्यांचे सोदाहरण विवेचन केले आहे. डॉ. भागवत यांचे भाषाविज्ञान क्षेत्रातील हे मौलिक संशोधन असून, अलीकडेच 'यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठा'ने या शास्त्रीय कसोटीची दखल घेतली असून, विद्यापीठातील ग्रंथनिर्मितीच्या कार्यात या कसोटीचा साक्षेपी वापर करण्याचा त्यांचा मनोदय असल्याचे कळते. ही बाब खचितच अभिनंदनीय आहे. मात्र, या मार्गदर्शक सूत्राचा वापर विवेकानेच करावा लागेल याची लेखिकेला जाणीव दिसते. पृ. २९३ वर त्या म्हणतात, ''....दुर्बोधता जोखण्यासाठी तयार केलेले हे सूत्र घोकत एखादी व्यक्ती लेखन करण्यास बसली तर तिच्या हातून होणारे लेखन यांत्रिक व निर्जीव ठरेल. या सूत्रातील तत्त्वांची जाणीव बाळगून सुरुवातीला स्वतंत्रपणे केलेल्या लेखनाची या सूत्राधारे चाचणी करून नंतर आवश्यकतेनुसार त्या लेखनात फेरफार करणे हे श्रेयस्कर ठरेल....'' परंतु सर्वसामान्यपणे व्यवहारातील धकाधकीच्या जीवनात व विशेषत: शासकीय यंत्रणेच्या धबडग्यात ते फारसे शक्य होणार नाही, म्हणून कर्मचाऱ्याने स्वत: केलेले लेखन एकवार स्वत: वाचून पाहणे, ते आपले आपणांस कळले की नाही हे तपासणे आणि त्यानंतर एखाद्या त्रयस्थ व्यक्तीकडून ते वाचून घेणे आणि त्याच्या आकलनात काही अडथळा आल्यास त्यास दुरुस्त्या करणे ही आत्मपरीक्षणाची सवय लावून घ्यावयास हवी. विशेषत: आपले लेखन समाजातील कोणत्या थरातील माणसासाठी आहे, त्याचे प्रयोजन काय आहे याचे भान प्रत्येकाने ठेवले तरच ते लेखन सुबोध होईल. अखेरीस ही आत्मनिष्ठ,

व्यक्तिनिष्ठ व प्रयोजननिष्ठ कसोटीच सामान्य कर्मचाऱ्यास उपयोगी ठरेल.

हा संपूर्ण अभ्यास करताना डॉ. भागवत यांनी या संदर्भात वेळोवेळी निरनिराळ्या मान्यवर विद्वानांनी जे अभिप्राय व्यक्त केले त्यांची अत्यंत साक्षेपाने दखल घेतली असून, योग्य ठिकाणीं ते उद्धृतही केले आहेत.

अनुवादित मराठीवर इंग्रजीच्या वाक्यशैलीचे सावट, परिभाषानिर्मितीत संस्कृतप्रचुरतेचा हव्यास आणि तथाकथित राष्ट्रीय एकात्मतेच्या नावाखाली मराठीच्या मानेवर हिंदीचे जोखड या तीन दडपणांतून जेव्हा मराठीची सुटका होईल तो सुदिन! या संदर्भात, पृ. ५५ वर लेखिकेने श्री. कृ. स. अभ्यंकर यांचा एक बोलका अभिप्राय उद्धृत केला आहे - ''इंग्रजीच्या सासुरवासातून मराठीची सुटका झाली पाहिजे याबद्दल मतभेद फारच थोडा आहे. राष्ट्रभाषा म्हणून 'हिंदुस्थानी'रूपी जी नवी आखाडसासू निर्माण होत आहे तिच्या जाचाबद्दल ओरड करण्यातही मतैक्य आहे, मात्र संस्कृतच्या माहेरवासातूनही मराठीला जास्त मोकळीक मिळाली पाहिजे.'' ('मराठी भाषा माहेरवासातून कधी सुटणार?' - ले. कृ. स. अभ्यंकर - 'मनोहर' - फेब्रु. १९४६) सर्व भारतीय भाषांनी शक्यतो संस्कृत-आधारित एकरूप शब्दावली स्वीकारावी हे केंद्र सरकारचे मार्गदर्शक तत्त्व असले तरी, ते कायद्याने बंधनकारक नव्हते. त्यातील 'शक्यतो' या शब्दाकडे सर्वांचे दुर्लक्ष झाले. वस्तुतः अनेक भारतीय भाषांमध्ये संस्कृत शब्दसंग्रह असला तरी, बहुतेक बाबतींत एकच संस्कृत शब्द निरनिराळ्या भाषांमध्ये निरनिराळ्या अर्थांनी, कधी कधी तर परस्परविरुद्ध अर्थांनी, अनेक शतकांपासून प्रचलित झालेला आहे. (याची कित्येक उदाहरणे देता येतील. उदा. 'जातीय' हा शब्द मराठीत **'communal'** **'national'** या अर्थी प्रचारात आहे.) त्यामुळे असे एकरूपतेचे बंधन लादले तर, स्थानिक पातळीवरील भाषाव्यवस्थेला तडा जाईल याचे भान महाराष्ट्र सरकारला फार उशिरा आले. (श्रीमती भागवत यांनी या मुद्द्याचा उल्लेख केला असला तरी, त्यांना एकरूप शब्दावलीचे तत्त्व हा भ्रमाचा भोपळा आहे हे जाणवलेले दिसत नाही. हे तत्त्व काही अंशीं बंधनकारक आहे असे त्यांनीही गृहीत धरल्यामुळे त्यांनी या मुद्द्याचा फारसा ऊहापोह केलेला नाही.) परंतु याचा अर्थ असाही नव्हे की, मराठीने संस्कृत, इंग्रजी व हिंदी या सर्वांपासून फटकून राहावे. उलट, मराठीला या सर्वांची गरज आहे. स्वत्व न गमावता व इतर भाषाभगिनींची





अनुक्रमणिका

कुरघोडी चालवून न घेता, मराठीने आवश्यक तेथे त्यांचे सहकार्य घेतले तर, मराठी अधिक समृद्धच होईल. लेखिकेनेच म्हटल्याप्रमाणे, ''.... आरशाचा उपयोग करायचा असेल तर तारतम्यबुद्धीचे डोळे असणे आवश्यक आहे.'' (पृ. २४४)

मूळ संशोधन १९७७-८० सालचे असले तरी, प्रकाशनापूर्वी लेखिकेने ते १९९४ सालापर्यंत अद्ययावत् केले आहे. तथापि, इतक्या सांगोपांग व व्यापक ग्रंथात काही चार-दोन त्रुटी राहून जाणे हे अगदी स्वाभाविक आहे. पण भविष्यात त्यांचे निराकारण व्हावे या दृष्टीने काहींचा उल्लेख आवश्यक वाटतो. भाषेच्या दुर्बोधतेची मीमांसा करीत असताना, पुस्तकलेखनालाही तो दुर्गुण नव्हे, पण त्याचा वाण लागलेला दिसतो. ('संवादक्षमता' ऐवजी) 'संवादसंस्थापनक्षमता', ('निर्विवाद' ऐवजी) 'आव्हानातीत', ('बोजडपणा' ऐवजी) 'बोजडता', ('छाननी' ऐवजी) 'परिनिरीक्षण' हे अनघड शब्द काहीसे खुपतात. **'histogram'** या शब्दाचे 'दंडालेख' हे भाषांतर मात्र नमुनेदार परिभाषेचे उदाहरण म्हणता येईल. सदर पुस्तकाच्या छपाईच्या काळात काही कौटुंबिक आपत्तीमुळे श्रीमती भागवत छपाईकडे पुरेसे लक्ष देऊ शकल्या नाहीत. त्यामुळे त्यांना मान्य नसलेले काही अशुद्ध शब्दप्रयोग मुद्रितशोधकाच्या अवकृपेने यात घुसलेले आहेत. (उदा. 'कर्मणि प्रयोग' ऐवजी 'कर्मणी प्रयोग', 'बहुंशी' ऐवजी 'बव्हंशी', 'दर्जाचा' ऐवजी 'दर्ज्याचा', इ.) 'अधिभाषिक प्रयोजन' ही खास भाषाशास्त्रीय संकल्पना असल्याने तिचा कोठेतरी खुलासा व्हावयास हवा होता. प्रकरण चार वं पाच या दोहोंमध्ये विविध भाषिक नमुन्यांची चिकित्सा करण्यात आली आहे आणि त्यासाठी ते नमुने सविस्तर स्वरूपात दिले आहेत. ही पुनरुक्ती टाळून दोनऐवजी एकच प्रकरण करता आले असते काय? परिशिष्ट दोन व तीन यांचीही हाताळणी एकत्रितपणे करता आली असती असे वाटते, म्हणजे पुस्तकाचा अनावश्यक विस्तार झाला नसता. परिशिष्ट एक हे ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून योग्य वाटते. तसेच, ४ थे व ५ वे ही परिशिष्टे भाषाअभ्यासकाच्या दृष्टीने उपयुक्त आहेत. हे लक्षात घेऊन, अखेरीस एक सूचना करावीशी वाटते की, 'भाषा संचालनालय' व 'राज्य मराठी विकास संस्था' या दोघांनी एकमेकांच्या सहकार्याने सदर ग्रंथाच्या बाबतीत 'न्यून तें पुरतें, अधिक तें सरतें' करून, त्याच्या आधारे एक सुटसुटीत, छोटेखानी सारपुस्तिका तयार करावी व महाराष्ट्र सरकारच्या सर्व कार्यालयांना तिच्या प्रतींचे वाटप करावे.





अनुक्रमणिका

असे झाले तरच या बहुमोल ग्रंथाचे सार्थक होईल!

पुनश्च एकदा डॉ. गीता भागवत व प्रकाशक 'राज्य मराठी विकास संस्था' यांचे मन:पूर्वक अभिनंदन!

*(प्रशासनिक मराठी भाषेचा विकास, डॉ. गीता भागवत, डिसेंबर १९९६, पृ. ४२२ किं. रु १५०/- प्रका. राज्य मराठी विकास संस्था, मुंबई)*

□□□

**१६, यशोदाकुंज सोसायटी, तेजस्‌नगर,**
**कोथरूड. पुणे ४११०२९**

---

परिषदवार्ता

*मराठी अभ्यास परिषदेच्यावतीने प्रतिवर्षी मराठीतील सर्वोत्कृष्ट भाषाविषयक लेखनास बँक ऑफ महाराष्ट्र या संस्थेने पुरस्कृत केलेले महाबँक पारितोषिक दिले जाते. १९९८ सालातील पारितोषिकासाठी* ***डॉ.गीता भागवत*** *यांच्या 'प्रशासनिक मराठी भाषेचा विकास' या ग्रंथाची निवड करण्यात आली.*

*हे पारितोषिक गीता भागवत यांना* ***रविवार दि. २९ नोव्हेंबर १९९८*** *रोजी* ***मा. यशवंत कानिटकर*** *यांच्या हस्ते दिले गेले. 'मराठी कोशरचना :- काही समस्या' या विषयावर कानिटकरांचे भाषण झाले. हा कार्यक्रम राजवाडे सभागृह, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे येथे झाला.*

**यापूर्वीचे पुरस्कार असे आहेत :**

*श्री. दि. परचुरे - मराठी गद्यलेखन शैलीचा उद्‌गम आणि विकास (१९९६)*
*शकुंतला क्षीरसागर - केशवसुतांच्या कवितेचा शैलीवैज्ञानिक अभ्यास (१९९५)*
*माधव देशपांडे - संस्कृत आणि प्राकृत भाषा : व्यवहार, नियमन आणि शास्त्रचर्चा (१९९७)*





अनुक्रमणिका

# छोट्यांसाठी पाच सचित्र पुस्तिका

नीलिमा गुंडी

'अक्षर-नंदन'च्या मुख्याध्यापिका वर्षा सहस्रबुद्धे यांनी लिहिलेल्या पाच पुस्तिकांचा संच प्रसिद्ध झाला आहे. शिक्षणविषयक डोळस प्रयोगशीलता, बालमानसशास्त्राचे ज्ञान आणि मुलांच्या विश्वाचा प्रत्यक्ष अनुभव या त्रिवेणी संगमातून या पुस्तिका साकार झाल्या आहेत. वाचनाच्या जगात नुकत्याच डोकावलेल्या मुलांसाठी या पुस्तिका आहेत. त्यामुळे मोजके शब्द आणि बोलके चित्र अशा दुहेरी संवादमाध्यमांचा यात खुबीदारपणे उपयोग केला आहे. माधुरी पुरंदरे यांची चित्रे सहजसुंदर आहेत.

या पुस्तिकांमध्ये मोठ्यांसाठी लिहिलेल्या एका पानातून प्रत्येक पुस्तिकेमागची स्वतंत्र भूमिका लेखिकेने स्पष्ट केली आहे; तर 'मनातले' या शीर्षकाच्या सामायिक प्रास्तविकात लेखनामागचा दृष्टिकोण मांडला आहे. ''शैक्षणिक अनुभवात जिवंतपणाची फुंकर घालायची, तर मुलांकडे जागेपणानं बघत राहायला हवं.'' या शब्दांतून लेखिकेच्या दृष्टिकोणाचे वैशिष्ट्य लक्षात येते.

''मी सापडवलं आहे!'' ही पुस्तिका म्हणजे परिसर-निरीक्षणाचे सूत्र, सहजता आणि आनंद यांच्याशी सांगड घालून कसे आचरणात आणता येते; याचे उदाहरणच आहे. ताईंनी दिलेल्या पिशवीत प्रत्येक मुलाने मोकळेपणाने (आखून दिलेल्या काही मर्यादांमध्ये) गोळा केलेल्या वस्तू कशा आणल्या, त्यांची वर्गवारी करून त्यांचे प्रदर्शन कसे भरवले याचे सचित्र निवेदन यात आहे. या निरीक्षणातील उत्स्फूर्तता मुलांच्या भाषेतूनही जाणवते. उदा.''ए ही काटकी बघ कसली टोकीदार आहे ना!''

''फुगला टम्'' या पुस्तिकेत फुगा खेळताना फुग्याशी संबंधित आवाज व फुग्याचे बदलते आकार यांचे सूक्ष्म निरीक्षण मुलांनी शब्दांकित केले आहे. खास स्वतःच्या शैलीत क्रियाविशेषणे वापरण्याची मुलांची लकब येथे अचूक टिपली आहे. (मुले कृतिशील असल्यामुळेच त्यांना नवनवी क्रियाविशेषणे सुचत असावीत!) उदा. ''झुम् करून फुगा वाकडातिकडा गेला.'' यातील निरीक्षण हे जसे कार्यकारणभाव लक्षात आणून देणार, आहे तसेच मुलांच्या भावनिक प्रतिक्रियाही नोंदविणारे आहे. त्यामुळे ''जोरात फुगवल्यावर माझा फुगा फुटला''





अनुक्रमणिका



“मला बघ
काय सापडलं-
शंख...”



“ए ही काटकी बघ
कसली टोकीदार आहे ना!”





अनुक्रमणिका

याबरोबरच ''फुगा फुटला म्हणून मला खूप रडू आलं'' या प्रतिक्रियेलाही त्यात स्थान आहे. सर्व पुस्तिकांमध्ये ही पुस्तिका विशेष सरस उतरली आहे.

''टिपिक् .... पाँ .... भर्रर्र'' या पुस्तिकेत शाळेतील मुलांनी चिडीचूप बसल्यावर ऐकू आलेले आवाज स्वतःच्या शब्दांत पकडले आहेत. त्यात गळणाऱ्या नळाचा 'टिपिक्' असा आवाज जसा आहे, तसेच कुणाच्या शिंकण्याचा आवाजही आहे. निसर्ग, मानवी जग आणि यंत्र यांचे विविध पातळ्यांवरील आवाज त्यात आले आहेत. यात आणखी काही आवाज नोंदवायला हवे होते, असे वाटत राहते. तसेच अगदी गप्प बसल्यावर ऐकू येणाऱ्या आवाजांबरोबर दंगामस्ती करतानाही ऐकू येतील असे आवाज (उदा. घंटेचा 'टण्' आवाज) एकत्रितपणे येतात, हे खटकते.

''अशी पानं तशी पानं'' या पुस्तिकेत मुलांनी गोळा केलेली तऱ्हेतऱ्हेची पाने सचित्र सादर केली आहेत. त्यात पानांचा आकार, स्पर्श, त्यांची इतर वैशिष्ट्ये या विषयीची मुलांना झालेली जाणीव महत्त्वाची आहे. कल्पनाविश्व समृद्ध होण्यासाठीही वास्तवाचे सूक्ष्म निरीक्षण नकळत मदत करीत असते, याचे भान या पुस्तिकेत आढळते. कारण शेवटी मुलांनी काढलेल्या पानांच्या चित्रांमध्ये खरीखरी आणि मनातील ही पाने आहेत!

''पास की नापास'' ही पुस्तिका शब्दांशी खेळता खेळता मुलांच्यातील मूल्यविवेक जागा करण्याचा प्रयत्न करते. दैनंदिन जीवनातील प्रसंगांतून आपल्या वागण्याचे स्वतःच मूल्यमापन करणारी मुले यात आहेत. त्यामुळे ''पान उलटताना बोटाला थुंकी लावली'' यावर ''नापास!'' अशी प्रतिक्रिया मुलेच व्यक्त करतात. अर्थात यातील प्रत्येक शेरा सर्वमान्य होईलच असे नाही. उदा. 'पंसारा करण्यात' नापास ठरवण्यापेक्षा 'पसारा न आवरण्यात' नापास ठरवणे अधिक योग्य झाले असते.

या सर्वच पुस्तिका मुलांसाठी तसेच पालक व शिक्षक यांच्यासाठीही आहेत. यातील मुलांची सहज बोलीभाषा आणि व्यंगचित्रांकडे झुकणारी चित्रशैली मुलांची मने जिंकील. या पुस्तिका मुलांच्या कृतिशीलतेलाही दिशा देतील. त्याचप्रमाणे मुलांचे शिक्षण किती प्रकारे होत असते याविषयीच्या नवनव्या शक्यता लक्षात आणून देऊन या पुस्तिका पालक व शिक्षक यांच्या मनाची अनेक बंद कवाडे खुली करायलाही मदत करतील.

पुस्तिका :

''मी सापडवलं आहे!'' ''फुगला टम्'' ''टिपिक्... पाँ.... भर्रर'' ''अशी पानं तशी पानं''आणि ''पास की नापास'' - लेखिका वर्षा सहस्रबुद्धे, चित्रे - माधुरी पुरंदरे - राजहंस प्रकाशन, पुणे, १९९६, किंमत प्रत्येकी १० रु. (पृष्ठसंख्या प्रत्येकी २४)

□□□

३, अन्नपूर्णा, १२५९ शुक्रवार पेठ,
पुणे ४११००२, दूरध्वनी : ४८६०१५

---

## महाराष्ट्र माउली

सुखदुःखाच्या काळी अथवा जवळदूरच्या स्थळी
सुदृढ वा तनु जर्जर जाहली ॥
प्रिय माझी ती आठवते मज महाराष्ट्र माउली ॥धृ॥
गिरी विंध्याद्री हा केशपाश साजिरा ।
गिरि सह्य जियेचा पदर गमे धावरा
श्री गोदारूपी कंठहार हासरा
श्री कृष्णौघाचा कमरपट्ट गोजिरा
तीर्थक्षेत्रे भली जियेची मंगल भूषावली
विखुरली स्थळोस्थळी चांगली ॥१॥ प्रिय माझी ती-
श्री ज्ञानेश्वर हा पुत्र जिचा थोरला
बहु भावंडांना कल्पतरू जाहला
त्या माजि शिवाजी वीरमणी जन्मला
जोडीस तयाच्या समर्थ तो लाभला
देति साद चाहुली तयाच्या खोऱ्यातुनि मावळी
जियेची कूस अशी पोसली ॥२॥ प्रिय माझी ती -
जी मानवैभवी श्रीमंती मानिते
जी सरस्वतीचे क्रीडांगण शोभते
जी कलागुणांचे धात्रीपण मिरविते
जी पुण्यतपांचे माहेरचि जागते
'साधुदास' तत्पदी वाहतो सादर पुष्पांजली
तुम्ही घ्या भाग त्यात मंडळी ॥३॥ प्रिय माझी ती -

दि. १८-१०-१९४१ 'साधुदास' गो. गो. मुजुमदार
गोपाळ गोविन्द.

**(रोहिणी तुकदेव, सांगली यांच्या सौजन्याने यांनी साधुदासांच्या साहित्याचे संशोधन आणि प्रकाशन केले आहे.)**





अनुक्रमणिका

# कुंदाची भाषाशैली

गंगाधर गाडगीळ

मी माझ्या फौन्टनपेनने जमिनीवर लिहायला दिले नाही की कुंदा रडत घरांत जाऊन आईला सांगते, ''बाबा माल्ल!''

आणि आईने बाहुली आमटीत बुचकळण्याला हरकत घेतली की ती बाहेर येऊन रडत रडत मला सांगते, ''आई माल्ल.''

'माल्ल' बरे का ! 'माललं' नव्हे. आणि म्हणे जोडाक्षरे कठीण असतात. खरे म्हटले म्हणजे परिकथेतल्या हंसीला उचलूं पहाणारी माणसे जशी एकमेकांना चिकटून बसली होती तशी मुलांच्या जिभेवरची अक्षरे एकमेकांना चिकटून बसलेली असतात. एक 'ल' म्हटल्यावर दुसरा 'ल' त्याच्या मागोमाग अडखळत धावतो. करणार काय बिचारा ! चिकटूनच बसलेले असतात ना दोघे ! पण माणसे मोठी झाली की परीकथा संपते आणि सोन्याची अंडी घालणारी हंसी पळवणारे चोर मग चिकटून बसत नाहीत. खुशाल तिला भाजीच्या झोळीत घालून ती आपापल्या घरी प्रतिष्ठितपणे जाऊ शकतात.

'बा'च्या पुढे पुन्हा 'बा'च येतो, म्हणून 'बाबा' अशी हांक मारायला मुले चटकन् शिकतात. पण आईला हे पटत नाही. तिला वाटते की आपण तिचे इतके करतो पण पोरीचा ओढा बाबाकडे ! आपल्या आधी त्यालाच हाक मारायला शिकली. म्हणून ती रागावून बसते. आता काय म्हणावे या रागाला?

आणि नुसती अंघोळ घातली आणि दूध पाजले म्हणजे मुले प्रेम करायला लागतात की काय ! आंपल्यासारखीच ती स्वार्थी आहेत असे समजणे ही आईवर्गाची मोठीच चूक आहे. बाबा नसेल दूध पाजत. पण वेडीवाकडी तोंडे करून आपल्या मुलीच्या भोवती तो नाचतो ना ! आणि अजागळासारखी मान हलवून आपल्या डोक्यावरची हॅट कोण हो पाडवतो ! मग का नाही बाबाकडे मुलीची ओढ असणार !

पण हा वादविवाद येथे अप्रस्तुत आहे. प्रतिपक्षाने ह्या बाबतीत फार जोराचा प्रचार चालवला आहे म्हणून मी त्याचा येथे नुसता उल्लेख केला इतकेच ! नाही तर दुसऱ्याची उणीदुरी काढणाऱ्या माणसांतला मी नव्हे.

येथे प्रश्न आहे तो एकमेकांना चिकटलेल्या अक्षरांचा. आता हेच पहा ना, आई घरात ताटे मांडू लागली की कुंदा धावत बाहेर येऊन मला चापट्या मारून सांगते, ''बाबा जेवायया या...''

'बाबा जेवायला चला,' असे खरे म्हटले म्हणजे तिला म्हणायचे असते. हो ! 'चल', 'चला' नव्हे. पण एक 'य' उच्चारला की दुसरा येतो आणि मग तिसरा आणि त्याने काही बिघडते असे मला वाटत नाही. 'जेवायला चल' ह्यापेक्षा 'जेवायया या' हेच आपल्याला अधिक पसंत आहे. कारण ते अधिक अर्थवाहक आहे. 'जेवायला ह्या शब्दांतले 'य' हे अक्षर किती महत्त्वाचे आहे ते त्यामुळेच माझ्या ध्यानात आले. जेवणाविषयीची सारी रसाळ उत्सुकता त्या '-ययाया'मुळे व्यक्त होते आणि ते '-ययाया'- सुद्धा तालासुरावर म्हणायचे बरे का ? '-ययाऽऽयाऽऽ' नुसते '-ययाया' नव्हे.

'य' ह्या अक्षराची थोरवी ही अशी आहे. उगीच नाही तुकारामाने आपल्या अभंगांत 'मी'चे 'म्या' केले.

'य' ह्या अक्षराचे महत्त्व जसे तुकारामाला समजले होते तसेच तालासुरावर बोलण्याचेही कळले होते. म्हणून तर त्याने अग्रलेख न लिहिता अभंग लिहिले.

आता हेच पहा ना, ''बाबा मिळाला'' हे वाक्य नुसतेच घेतले तर तर्खडकरांच्या पुस्तकांत भाषांतराकरिता नंबरवार दिलेल्या तोकड्या वाक्यांची आठवण येते. दादोबा पांडुरंगांच्या लघुव्याकरणातला रामा जितक्या निर्विकारपण पेरू खातो, तितक्याच निर्विकारपणे हा बाबा मिळतो. आणि मग 'मिळाला' हे नाम की अव्यय असा प्रश्न उपस्थित होतो व आपण अदमासे 'अव्यय' असे उत्तरहि देऊन टाकतो.

पण आपण कॉलेजातून घरी येत असतांना गॅलरीच्या कठड्यावर जेमतेम आलेल्या दोन डोळ्यांनी आपल्याला हेरले आणि मग गॅलरीत उड्या मारीत 'बाबा मिलाऽऽला' असे जर तालासुरावरचे गाणे सुरू झाले तर वाक्यांत किती वेगळा आणि गोड अर्थ भरतो. 'मिळाला हे नाम की व्यत्यय', 'ते शुद्ध की अशुद्ध' वगैरे प्रश्न मग अगदी अप्रस्तुत ठरतात.

शब्दांच्या सुरवंटांची अशी झालेली फुलपाखरे आपल्या घरात सारखी भिरभिरत असतात.

कधी कधी कुंदाची आई आरशासमोर उभी राहून नटत असताना मान तुकवून बाबाला विचारते, ''कशी दिसते मी आता?''

ह्यावर बाबा कधी कर्तव्यबुद्धीने तर कधी कौतुकाने म्हणतो, ''सुंदर!''

जवळच पाठीमागे हात बांधून गंभीरपणे उभी असलेली कुंदा हे ऐकते आणि मग मान कलती करून, आपल्याला फार मोठा शब्द उच्चारायचा आहे ह्या जबाबदारीच्या जाणिवेने ती म्हणते, ''छोंदऽल!''

का कोण जाणे, पण तिने असे म्हटल्यावर 'सुंदर' ह्या शब्दाचे नाक लालबुंद व स्क्रूसारखे पिरगळलेले आहे असे तिच्या बाबाला वाटते! आणि तो हसतो.

त्यामुळे तिच्या आईचे नाक खरोखरच लाल आणि फुगीर होते. आणि ती चिडून म्हणते. ''तुला कोणी विचारलंय् ग? मला 'छोंदल' बिंदल म्हणायचे नाही हं. सांगून ठेवते.''

बाबा दाढी करीत असला की कुंदा कौतुकाने त्याच्याकडे पाहत राहाते. त्याच्या तोंडाला फासटलेल्या फेसाची गंमत वाटून तिला मधून मधून खूप मोठ्याने हसू येते आणि कधी कधी त्याच्या गालावरचा फेस जर खाली पडला तर ती ते कर्तव्यबुद्धीने त्याला दाखवून देते.

तिकडे बोट करून ती म्हणते, ''बाबा, दायी पय्या.''

आणि कधी कधी स्वतःच्या गालाला दाढी लावण्याचीही ती विनंती करून पाहते. जमले तर आपले तेवढेच.

मोठ्या माणसांचे बेटे सगळेच चुकते. त्यांना एवढेही कळत नाही की दाढी करणे ह्या क्रियेतील गालाल खूपसा साबणाचा फेस फासटणे हा सर्वांत महत्त्वाचा भाग आहे. आणि म्हणून त्या फेसालाच दाढी हे नाव विशेष शोभते. ती बेटी गालावरच्या केसांच्या खुंटांनाच दाढी म्हणतात!

नुसत्या तोंडानेच शब्दांच्या द्वारेच बोलायचे हा देखील मोठ्या माणसांचा बालिश आग्रह असतो. कुंदा मात्र तसे करीत नाही. तिचे सगळे शरीरच मुळी बोलते. रस्त्यात तिला कुत्रे दिसले की ती चालायची थांबते आणि ओरडते, ''कुतु ! बग्गा, बग्गा! कुतु-कुतु! गेया ! भू ! भू ! ''

'बग्गा ! बग्गा !' बरे का. नुसते 'बगा! बगा!' नव्हे. आणि नुसते





अनुक्रमणिका

'कुतु' नव्हे तर उड्या मारून, हातवारे करून, मोठ्याने हसून 'कुतु!' आणि नंतर कमरेत वाकून गाल वर चढवून आणि डोळे टप्पोरे करून'भू ! भू ! भू!'

'भू ! भू!' करताना काही जमिनीवर हात टेकून पायांवर चालल्याचा अभिनय करावा लागत नाही. नुसते वाकले म्हणजे पुरते. तसेच ती चहा करायला लागली म्हणजे देखील भांड्यात पाणी असावे लागत नाही आणि खराखुरा स्टोव्हही पेटावा लागत नाही. एका भांड्यावर दुसरे भांडे ठेवले की स्टोव्हवर आधण चढते. कुठल्याहि बारक्या भांड्याचा कप होऊ शकतो. आणि तो बाबाला दिल्यावर बाबाने 'शी फू' करीत तो तोंडाला लावला की चहा देखील पिऊन होतो.

खरा चहा आणि खोटा चहा, खरे दूध आणि खोटे दूध ह्यांतला फरक कुंदाला समजत नाही असे तुम्हांला वाटते की काय? तो फरक कुंदाला चांगलाच माहीत आहे. तिला खरीखुरी भूक लागली म्हणजे ती काही खोट्या दुधाचा प्याला तोंडाला लावत नाही. खरे खरे दूध मग ती आईजवळ मागते.

आणि तसेच 'भू-भू' करताना दोन्ही हात टेकून रांगण्याची आवश्यकता नाही हेही तिला समजते. नुसते वाकले म्हणजे काम भागते. बाकीचे ती आपल्या आणि तुमच्या कल्पनाशक्तीवर सोपवते. पण अर्धवट वाकले मात्र पाहिजे हं ! स्टेजवरची माणसे खरी आहेत अशी आपण कल्पना करू शकतो. पण स्टेजच नसले आणि माणसेच नसली तर?

पण तुम्ही म्हणाला की कुत्रा पाहिल्यावर 'भू-भू' म्हटलेच पाहिजे? खोटा खोटा चहा करायला हवाच कशाला ? ह्याला कुंदा बापडी उत्तर काय देणार? पण तिने 'भू भू' म्हटल्यावर तुम्ही घाबरलां नाहीत तर तिचा विरस होईल. तिने दिलेला चहा 'शी-फू' करून तुम्ही प्यायला नाहीत तर ती रागावेल. व्याकरणाचे नियम जसे तुम्हांला माहीत आहेत तसे तिला आपल्या खेळाचे नियम माहीत आहेत. आणि तिच्या खेळात सामील होऊन तुम्ही ते पाळले नाहीत तर ते तिला खपणार नाही.

तसे पाहिले तर कुत्रा पाहिल्यावर कमरेत वाकून 'भू भू' असे न ओरडणेच मुळी चुकीचे आहे. कुत्रा पाहिल्यावर 'कुत्रा' हा शब्द काय एखादे यंत्र देखील उच्चारील. त्याकरिता माणसाची कशाला गरज आहे ? माणसाची गरज आहे

ती कमरेत वाकून 'भू भू' म्हणायला.

निर्जीव शब्दापेक्षा सजीव आविर्भावालाच कुंदा अधिक महत्त्व देते. ''तू वेडा आहेस. मी तुला मारीन'' असे प्रेमाच्या आविर्भावाने म्हटले तर त्याला ती विरोध करीत नाही. पण ''तू शहाणी आहेस,'' असे खूप रागारागाने म्हटले तर मात्र ती रडूं लागते.

तसे पाहिले तर शब्द म्हणजे काय ? वेडावाकडा उच्चार ! त्याला सगळे महत्त्व द्यायचे आणि मनाच्या स्थितीनुसार स्फुरलेले हावभाव व आविर्भाव ह्यांना कमी लेखायचे हा न्यायच मुळी उरफाटा आहे. अजून तो मान्य करण्याइतकी कुंदा माणसाळलेली नाही.

पण हळूहळू शब्दांना आपण दिलेले महत्त्व तिच्याही डोक्यात शिरू लागले आहे.

'आई माल्ल' अशी तक्रार बाबाजवळ आणायची आणि 'बाबा माल्लं' ही तक्रार आईजवळ न्यायची ह्या तिच्या सवयीबद्दल मघांशीच नाही का मी सांगितले. इतके दिवस रागावले तरी 'माल्ल' आणि चापटी मारली तरी 'माल्ल' असे ती म्हणत असे. त्या शहाण्या मुलीला शब्दांचा मार आणि हाताचा मार हे सारखेच दु:खकारक वाटत असत. हात हलला काय किंवा तोड हलले काय, दोन्ही गोष्टी जर तिला सारख्याच दु:खकारक वाटत होत्या तर त्यांना ती 'माल्ल' म्हणूनच संबोधणार होती. काय घडले हे ती आपल्या अनुभवानुसार ठरवायची. बाह्य घटनांना उगीच महत्त्व द्यायची तिची तयारी नव्हती. म्हणून राग आल्यावर ती कचकन् चावत असली तरी ती निष्पापच ठरत होती.

तिचा निष्पापपणा अजून कायम आहे. पण तिच्या स्थूल अनुभवांना आतां अधिक सूक्ष्म आणि निश्चित स्वरूप येत आहे. आपल्या मनाचे तापमान मोजणारे थर्मामीटर आता तिला सापडले आहे.

आता ती सर्वच कारणाकरिता एकाच टिपेत रडत नाही. आई बाहेर जायला लागल्यावर तिला बरोबर जाऊ नको असे म्हटले तर पहिल्याने ती अर्धवट आशंकेने हसत हसत म्हणते 'नाही'. आणि आईचे पातळ घट्ट पंकडून ठेवायची ती खबरदारी घेते. मग जरा जोरांत 'नको' म्हटले की ती आईला घट्ट बिलगून रडव्या आवाजात म्हणते, 'नाही.' ह्यानंतर तिचा हात धरून बाजूला

ओढली तर ती मोठ्याने रडू लागते आणि जर तिला टाकून आई बाहेर गेली तर मात्र चांगलेच भोकांड परसते. दु:ख झाले म्हणजे नुसता एक गडद काळा ठिपका तिचं मन व्यापून टाकत नाही. त्याच्या अनेक छटा असतात. तो ठिपका कधी गडद काळा असतो तर कधी नुसता भुरका.

'माल्ल' आणि 'लागाव्वा' ह्यांत ती आता अशाच प्रकारचा भेद करू लागली आहे. बाबाने नुसते डोळे वटारले अगर 'चल, चालती हो' म्हटले तर त्याला 'माल्ल' म्हणणे तिला अनुचित वाटते. ती रडत घरात जाते खरी. पण तिची आईकडे तक्रार असते, 'बाबा लागाव्वा' म्हणून. पण बाबा जर अंगावर खूप मोठ्याने खेकसला अगर त्याने कुल्ल्यावर एक सटकन् चापटी मारली तर मात्र मोठ्याने रडत 'बाबा माल्ल' अशी ती तक्रार करते.

पण मोठ्याने खेकसणे आणि चापटी मारणे ह्या दोन्ही गोष्टी 'माल्ल' मध्येच येतात बरे का ! अजून ती आपल्या अनुभवांनाच साक्षी समजते. बाह्य घटनांचे आपल्या मनात उमटणारे पडसाद एवढेच ती खरे मानते. म्हणून ती अजूनही निष्पाप आहे. प्रौढत्वी आपले शैशव जपणारा कवी असाच निष्पाप असतो. त्याची भाषाशैली अशीच असते.

कुंदा निष्पाप आहे खरी, पण म्हणून ती लबाडी अगर ढोंग करीत नाही असे मात्र समजू नका हं. कधी बाबाची अगर आईची सहानुभूती मिळवायची असली तर ती उगीचच 'माल्ल' अशी खोटी तक्रार करते. कधी कधी बाबाने मारल्यावर तक्रार घेऊन जात असतांना तिला वाटेत आपली भावली दिसते. मग ती तिथेच थांबते. भावलीला चहा पाजते. तिला चिऊ दाखवते. आणि हे सगळे झाल्यावर पुन: रडायला सुरुवात करून आईकडे आपली तक्रार नोंदवते.

एकदा तर आईने पेपरमिटाची गोळी द्यायचे नाकारले तेव्हा ती रडत रडत बाहेर गेली. आणि मग थोड्या वेळाने आपल्या भावलीला घरांत घेऊन येत म्हणाली, ''आई माजी गोळी दे.''

आई म्हणाली, ''काय लबाड आहे पोर!''

पण हे तिचे वागणे देखील मला निष्पापच वाटते. तिच्या अंत:प्रेरणेनुसारच ते घडत असते. त्यांच्यापलीकडचा दुसरा कुठचा निकष तिला माहीत नाही आणि मान्यही नाही. पण पुढे केव्हां तरी कुंदाला अधिक समजूं लागेल. भाषेचे तिला अधिक ज्ञान होईल. हलकेच चापटी मारली तरी त्याला ती 'मारले' ('माल्लं' नव्हे बरे का ! ते अशुद्ध आहे) म्हणू लागेल. आणि खूप मोठ्याने

खेकसले तरी त्याला 'रागावले' म्हणेल. कुत्रा पाहिल्यावर ती 'भू-भू' करणार नाही. नुसते 'कुत्रा' असे म्हणेल. त्या वेळी मात्र मग मी तिला निष्पाप म्हणणार नाही. आणि तिच्या भाषाशैलीवर असा एखादा लेखही लिहिणार नाही ! (सत्यकथा : ऑगस्ट, १९५३ मध्ये प्रसिद्ध झालेली ही कथा आस्थेने उपलब्ध करून दिल्याबद्दल सौ. वासंती गाडगीळ यांचे मन:पूर्वक आभार. संपादक)

□□□

**४ अभंग, साहित्य सहवास**
**वांद्रे पूर्व, मुंबई ४०००५१**

---

गोविंद नारायण माडगांवकर, लोकहितवादी आणि विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या भाषेसंबंधाने पाहिले असता गोविंद नारायण यांच्या भाषेचा साधेपणा लोकहितवादींच्या भाषेत विषयांची मांडणी करण्याचे चातुर्य व आवेश व चिपळूणकर शास्त्र्यांच्या भाषेमध्ये प्रौढपणा, अलंकार व संस्कृत शब्दांचे मिश्रण ही विशेष दिसून येतात. लोकहितवादी व माडगांवकर यांची भाषा आजला जरा जुनी झाल्यासारखी वाटेल; आजला प्रचारात नसलेले पुष्कळ शब्द व शब्दयोजनेचे प्रकार तिच्यातून दिसून येतील; पण कृष्णशास्त्र्यांच्या भाषेचा प्रकार तसा नाही. शास्त्रीबुवांचे संस्कृतभाषेचे ज्ञान वरच्या दोन्ही गृहस्थांपेक्षा अधिक असल्यामुळे निरनिराळ्या प्रकारचे अर्थव्यंजक शब्द, समास किंवा वाक्ये त्यांनी संस्कृत भाषेच्या साहाय्याने मराठीत नवीन तयार केली. त्यांच्या जाड्या संस्कृत अध्ययनाचा त्यांच्या मराठी लेखांवर सुद्धा परिणाम झाल्यामुळे त्या वेळी प्रचारात असलेले केवळ मराठी शब्द त्यांच्या लेखांत फार थोडे आले आहेत. त्यामुळे त्यांच्या भाषेत व त्या त्या मागून झालेल्या लेखकांच्या भाषेत भेद मुळीच दिसून येत नाही. शास्त्रीबुवांनी आणखी एक मोठा उपकार मराठी भाषेवर केला आहे. इंग्रजी पुस्तकांची विशेषतः शास्त्रीय विषयांवरच्या पुस्तकांची मराठीत भाषांतरे त्यांनी संस्कृत भाषेतून नवीन शब्द काढून, समासरचना करून केली आहेत. ती फारच उत्कृष्ट झाली आहेत, ''प्रकाशाचे वक्रीभवन'', ''भूमध्य समुद्र'' इत्यादी शब्द कर्णाला मनोहर वाटतात इतकेच नव्हे तर नवीनाप्रमाणे वाटत नाहीत. शास्त्रीबोवांच्या नंतर बऱ्याच तत्त्वज्ञानावरच्या व शास्त्रीय विषयांवरच्या ग्रंथांची भाषांतरे झाली आहेत, पण त्यांत शास्त्रीबोवांप्रमाणे पारिभाषिक शब्दांची नवीन रचना कोणी केली आहे, असे दिसून येत नाही.

***('मराठी वाङ्मयाची सद्य:स्थिती' संपादक डॉ. विद्यागौरी टिळक-डॉ.द.दि. पुंडे १९९८ स्नेहवर्धन, पुणे** मधून)*



अनुक्रमणिका

# 'झरोका'

नीलिमा गुंडी

लहान मुलांची भाषा हा एकप्रकारे 'झरोका'च असतो. त्यांचे साधेसे वाक्य नकळत भोवतालच्या सामाजिक वास्तवावर प्रकाशकिरण टाकून जाते. मराठीत मुलांच्या भाषेचा स्वतंत्रपणे अभ्यास झालेला आढळत नाही. तसा शास्त्रशुद्ध अभ्यास झाला तर आपल्याकडील बाल ते किशोरसाहित्याचा चेहरामोहराच बदलून जाईल. केवळ 'बोबडे बोल' हे मुलांच्या भाषेचे वैशिष्ट्य मानण्यापेक्षा, पुष्कळ तज्ज्ञांनी मानसशास्त्र, समाजशास्त्र इ. विद्याशाखांच्या मदतीने, मुलांच्या भाषेचा अभ्यास व्हायला पाहिजे.

मुलांच्या शिकण्याच्या प्रक्रियेत विचार आणि भाषा यांचे नाते किती जवळचे आहे; हे पुढील अवतरणातून स्पष्ट होईल -

"Thought is of great density and speed, and much of it is not within conscious control. If any of it is to be made coherent and communicative a ready-to-hand language is needed to net and give initial shape to the transient flow of ideas, pevceptions, images, feelings. One's everyday speech is the nearest-to-hand language that everyone has and is therefore particularly appropriate for new learning situations and first formulations - first draft of new thinking."[१]

मुलांच्या भाषेचे हे महत्त्व लक्षात घेऊन मी या लेखात माझे व माझ्या जवळच्या मैत्रिणींचे अनुभव, तसेच वाचन या आधारावर मुलांच्या भाषेविषयी काही निरीक्षणे मांडण्याचा प्रयत्न करी त आहे. साधारणतः १० वर्षापर्यंतच्याच मुलांचे शब्द येथे विचारात घेतले आहेत.

सुरुवातीला मुलांचे विश्व घर ते शाळा इतकेच मर्यादित असते. मुलांच्या सामाजिकीकरणाची सुरुवात म्हणजे त्यांची शाळा. स्वतःच्या कोषातून बाहेर पडून चारचौघांत मिसळताना त्यांच्या मनावर ताण पडत असणारच. त्या ताणाचे दर्शन त्यांच्या शब्दाशब्दांतून सहज घडत असते. साध्या भांडणासारख्या प्रसंगामुळे गटात एकटे पडण्याचा अनुभव त्यांना कधीतरी चाखावा लागलेला असतो.'एकटे' उरण्यातील असहायता त्यांच्या मनात खोल दबा धरून बसते. त्यांचे उद्गार प्रत्यक्ष शाळेविषयीच असतील असे नाही; कोणत्याही संदर्भात येणाऱ्या त्यांच्या सहज उद्गारातून गट(कळप?) आणि मूल, यांच्या नात्याविषयी नकळत भाष्य येते.

छोट्या प्रणवला घरी 'रामायणा'ची गोष्ट सांगणे चालू होते. ''दशरथ राजाला तीन राण्या होत्या.'' या पहिल्याच वाक्यावर त्याची प्रतिक्रिया होती ती अशी -''तीन राण्या नि बिच्चारा एकटा दशरथ राजा !''

यात अगदी मुलगा-मुलगी असे गट पडले तरी संख्येच्या बळावर एक गट दुसऱ्या गटावर कशी कुरघोडी करीत असतो; याचा अनुभवच कोरला गेला आहे.

शाळेमधील वर्तनपुस्तिकेत 'जात' यापुढील रकान्यात 'प्रगत' इतकाच शेरा लिहून मी तपशील नोंदविले नव्हते. एक दिवस मुक्ताने मला अगदी काकुळतीला येऊन सांगितले होते -''आई, माझ्या वर्गात सगळ्या मुली ब्राह्मण, मराठा अशा जातीच्या आहेत. प्रगत जातीची मी एकटीच आहे ग !'' गटापेक्षा वेगळे ठरण्यातील भीती तिच्या डोळ्यांतून आणि शब्दाशब्दांतून व्यक्त होत होती.

हल्ली घरोघरी, साधारणत: एक अथवा दोनच मुले आढळतात. अशा सर्व मित्रमैत्रिणींमध्ये एक मुलगा होत मात्र आणखी दोन भावंड असलेला होता. आपल्या असण्याचं समर्थन करीत पटकन म्हणाला, ''आईनं मला होऊ दिलंच असतं. कारण मला दोन्ही मोठ्या बहिणीच आहेत.'' आपण 'मुलगा' म्हणून जन्माला आल्याचे सार्थकही त्याच्या उद्‌गारात लपलेले होते !

लहान मूल घरीदारी कानी पडणाऱ्या शब्दांतून जे शिकत असते; ते औपचारिक शिक्षणाहून कितीतरी पटीने अधिक असते. गटात कोणाला कसे, किती आणि कधी महत्त्व येते याचे संकेत घरीदारी मुलांच्या सहज कानी पडणाऱ्या संवादातून होत असते. आत्ताच वर दिलेल्या मुलाच्या उद्‌गाराशी पुढील उद्‌गार जोडून घेता येतील. शोभा भागवत यांनी 'आपल्या पुस्तकात सादर केलेला हा बालभाषेचा नमुना पहा :

''बालवाडीत जेवायची वेळ झाली होती. तयारी करता करता बाई छोट्या अमलला म्हणाल्या, ''जा रे पटकन्, आपल्या ताटल्या घेऊन ये.'' अमल हाताची घडी घालून उभा होता. ती घडी त्यानं आणखी आवळली आणि जोरात मान हलवून म्हणाला, ''मी नाही काम कलनाल. मी पुलुश आहे.''[२] (''मूल नावाचं सुंदर कोडं,'' पृ. २४)

मुलांना 'घडविण्यात'(?) दूरदर्शनादी माध्यमांचाही कसा हातभार लागतो,

याचे प्रत्यंतर देणारा प्रसंग मंगला गोडबोले यांनी आपल्या पुस्तकात वर्णन केला आहे. तो असा : लेखिकेने मुलांना बाहुलीचे लग्न करायला घरी मोकळीक दिली होती. लेखिका घरी परतली तेव्हा बाहुलीचे हातपाय मोडलेले होते. त्यावेळी करवलीनं खुशीनं सांगितलं - ''आमच्या लग्न घरावर किनै दरोडा पडला, मावशी.''[१] (''माझी पालकनीती'', पृ. २४) यातला लहानगीचा कौतुकाचा सूर पोटात गोळा आणणारा आहे.

भोवतालचे वास्तव जसेच्या तसे शोषून घेण्याची प्रवृत्ती सर्वच मुलांची असेल, असे नाही. एखाद्याचे चिमुकले हात वास्तवाला नवा आकार द्यायलाही उत्सुक असतात. याचं हे एक निरागस उदाहरण -

घरामध्ये हमालांच्या लबाडीच्या आलेल्या अनुभवांविषयी चर्चा चालू होती. ती चर्चा छोट्या अनुरागच्याही कानावर पडली होती. नंतर थोड्या वेळाने तो एकदम म्हणाला, ''मी हमाल होणार.'' आई प्राध्यापिका आणि वडील वकील असताना या मुलाला हमाल व्हावंसं का वाटावं, याचं आश्चर्य सर्वांच्या चेहेऱ्यावर उमटलं असणार. छोट्या अनुरागनंच त्याचं निराकरण केलं -''सगळे हमाल लबाड असतात ना ! मी चांगला हमाल होईन !''

आपल्या सहज बोलण्यातून मुलांच्या मनात कसे पूर्वग्रह निर्माण होऊ शकतात, हे मोठ्यांनीही लक्षात घ्यायला हवे!

मुलांच्या मनात हळूहळू भोवतालच्या वास्तवाचे भान पक्के होऊ लागते. 'माझ्या आवडत्या बाई' या विषयावरचा मुक्ताचा निबंध तिने वर्गात वाचला. तेव्हा बाई निबंधाविषयी काहीच बोलल्या नाहीत. तिनं मला घरी आल्यावर सांगितलं ''आई, माझा निबंध बाईंना कसा आवडणार? मी त्यांच्यावर थोडाच निबंध लिहिला होता?'' अशा प्रकारचे मुलांचे उद्‌गार त्यांच्या मनावरची जखमच उघडी करतात. एरवी 'बाई' हे त्यांचे दैवत असण्याचे वय. पण एखाद्या बाईचा विपरीत अनुभव त्यांना असा जणू श्रद्धाभंगचाच अनुभव देऊन जातो. मग ८ ते १० वर्षातील चाणाक्ष मुले परिस्थिती हेरून बाईंच्या समोर बाईंना आवडेल असे बोलायला शिकतात. अशावेळी वाटतं-किती लवकर बनेल होताहेत ही मुले !

मुलांची आंतरिक जडण घडण चांगली व्हावी, यासाठी धडपडणाऱ्या

आई-वडिलांना मुलांच्या सामाजिक जीवनाबाबत विशेष जागरूक राहावे लागते. मुलांच्यात सामाजिक जीवनातील शिस्त अंगी बाणावी म्हणून भर देणारी जवळची व्यक्ती म्हणजे आई; असे सर्वसाधारण चित्र दिसते. त्यामुळे मुलांच्या आईविषयीच्या सहज प्रतिक्रिया फार महत्त्वाच्या ठरतात. गंमत म्हणजे त्यांच्या भावजीवनात आईला खूप महत्त्वाचे स्थान असते. त्यामुळे एकाच वेळी तिच्याविषयी प्रेम व राग असे भाव आढळतात. या दोहोचे काही नमुने देते :-

माझी एक मैत्रीण तिच्या छोट्या मुलाला ज्ञानेश्वरांच्या लहानपणीचा प्रसंग सांगत होती. 'ज्ञानेश्वरांना लोकांनी वाळीत टाकले. कोणी त्यांना खायला देत नव्हते.' हे सगळे ऐकून छोटा अगदी कासावीस झाला नि म्हणाला, ''आई, तू तरी का नाही त्यांना खायला दिलंस ?''

'आई'ला बहाल केलेलं हे मोठं प्रशस्तिपत्रच मानावं लागेल. सारं जग वाईट वागलं तरी आई चांगलंच वागेल; हा त्यातला विश्वास मनाला भिडतो.

पण प्रत्यक्ष दैनंदिन जीवनात मात्र आई आणि मूल यांच्यात सतत असे गोड नाते राहू शकत नाही. मुलाला गटात सामावून घेतले जावे म्हणून त्याला शिस्त लावण्याची आईची धडपड मुलांना काचतेच. याचे हे एक उदाहरण. जान्हवी स्मार्त यांनी लिहिलेला हा छोटा प्रसंग बोलका आहे. ''एकदा एक कावळा गॅलरीत ओरडत होता- म्हणून मी मनूला म्हणाले, ''अग तो खाऊ मागतोय बघ. ही पोळी त्याला नेऊन दे.'' तर हा मुलगा (शेजारणीचा) तिथं होता तो म्हणाला, ''त्याला देऊ नका. त्याचं नाव त्याच्या आईला सांगा. माझ्या आईनं सांगितलंय की कोणाकडे काही खाऊ मागायचा नाही.''[४] ('पालकनीती', पृ. १८)

त्यामुळेच बहुधा आई (सर्वसामान्य) आणि आई (खासगी) अशी जणू तिची दोन रूपे वाटू लागतात. कवितेत, निबंधात आईचे पहिले रूप येते नि व्यवहारात दुसरे रूप भेटत राहते.

आईवरील राग प्रगट करणे हे ही पुन्हा संकेतांच्या चौकटीत न बसणारेच! त्यावर तोडगा म्हणून की काय हल्ली लहान मुलांनी आईला चिडविण्याचा खेळ शोधून काढला आहे. म्हणायचं ते असं ''आई, तू वाईट आहेस, तू मला आवडत नाहीस.''इ. नंतर मोठा विराम घेऊन पुढे''असं मी कधी म्हणेन का ?''

मुलांच्या भाषेत विरेचन (catharsis) ही डोकावते ते असे !

आपण सहज एखादे दिव्याचे बटण चालू करतो अन् त्याक्षणी, तोपर्यंत

नीट चालणारा रेडिओ एकदम खरखरू लागतो. मुलांचे सहज कानी पडलेले शब्द माझ्या मनात कधीकधी अशी 'खरखर' सुरू करतात.

संदर्भः

१. "Understanding Children Talking," Nancy Martin & others, Penguin Books, England, 1976.

२. ''मूल नावाचं सुंदर कोडं'', शोभा भागवत, सुयोग प्रकाशन, पुणे १९९२.

३. ''माझी पालकनीती'', मंगला गोडबोले, रोहन प्रकाशन, पुणे, आ. २, १९९४

४. 'पालकनीती', १६ जुलै, १९९७, (व. ९, अंक ११)

□□□

**३, अन्नपूर्णा, १२५९ शुक्रवार पेठ,**
**सुभाषनगर, पाचवी गल्ली,**
**पुणे - ४११००२**

---

मासिक पुस्तकांच्या द्वारे जितकी वाङ्मयाला मदत होते, तितकी वर्तमानपत्रांनी होत नाही. कारण वर्तमानपत्रातल्या लेखांचे आयुष्य फारच क्षणिक असते. महाराष्ट्रभाषेतली वर्तमानपत्रे वाचली म्हणजे चांगली भाषाशैली हा गुण लेखकांच्या अंगी विशेषत्वाने पाहिजे, असे त्यांच्या कर्त्यास वाटते, असे दिसून येत नाही. कधीकधी या लेखकांना विषयांचे ज्ञान असूनही शुद्ध, सुबोध व चटकदार भाषा लिहिण्याचे कामी त्यांचा अभ्यास नसल्यामुळे, त्यांच्या लेखांचा लोकांचे मनावर जसा परिणाम व्हावा तसा होत नाही. शिवाय अशुद्ध, धेडगुजरी भाषा नेहमी वाचल्याने सामान्य वाचकांच्या अभिरूचीस वाईट वळण लागते. त्यांना चांगली व वाईट, शुद्ध-अशुद्ध, भाषा पद्धतीमधला दोष दिसत नाहीसा होतो, किंवा दिसूनही त्याचे विशेष महत्त्व वाटेनासे होते. यामुळे शुद्ध, सुरस लेखांची चहा नाहीशी होऊन भिकार, घाणेरड्या लेखांस उत्तेजन मिळते. या योगाने भाषाभिवृद्धीचा मार्ग खुंटून राष्ट्राचे कल्पनातीत नुकसान होते. यावरून सर्वच वर्तमानपत्रांची भाषा अशुद्ध असते असे म्हणण्याचा आमचा हेतू नाही. पण पुणे व मुंबई येथील मिळून चार पाच पत्रे, ज्यांचे संपादकत्व नावाजलेल्या लेखकांकडे आहे, ती वगळून इलाख्यातल्या बाकीच्या मराठी पत्रांतील भाषापद्धतीसंबंधाने फार उच्च मत देता येईल, असे आम्हास वाटत नाही.

**('मराठी वाङ्मयाची सद्य:स्थिती' संपादक डॉ. विद्यागौरी टिळक-डॉ.द.दि. पुंडे १९९८ स्नेहवर्धन, पुणे** मधून)

**पैसे भरण्याबद्दल सूचना :**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिष या नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेक सोबतच्या चिठ्ठीवर पै पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली. ते अवश्य लिहा नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ भर घालावी. पाव मागाहून पाठविली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी :**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ म केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्य मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

- ☐ चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षा ७५ रु.
- ☐ चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला १००
- ☐ सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील यापैकी असो)२०
- ☐ परदेशातील संस्थांसाठी वर्षाला २० डॉलर.
- ☐ सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ६ डॉलर इतकी पडे

**परिषदेची वर्गणी :**

सामान्य सभासदांची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापे अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अ हवा असला तर इतर सभासदांनी केवळ ३५ रु. भरायचे आहेत. उदाहरण : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ७५ + ३५ रु. असे एकूण ११० रु. भरावे लागतील.

**जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु. पाव पान २५० रु., शुभेच सूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन/तीन ८ रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम

नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३